॥ श्री विश्वनाथो विजयते ॥

राजवाडे संशोधन मंडळ ग्रंथमाला

१५

मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड २६ वा

शिवकालीन घराणीं

# भांबोरकर भोसले दप्तर

954·73

954·73
Bho
9853



श्री विश्वनाथो विजयते

# मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें-खंड २६ वा

राजवाडे संशोधन मंडळ ग्रंथमाला

ग्रंथ १५ वा

# भांबोरकर भोंसले दप्तर

छत्रपती शिवाजी महाराजांचे चुलते विठोजीराजे भोंसले यांच्या
आठ पुत्रांपैकीं परसोजीराजे भोंसले ऊर्फ भांबोरकर भोंसले
यांच्या घराण्याचे ऐतिहासिक लेख

डॉ. म. म. द. वा. पोतदार,
ग्रंथ संग्रह

शिवकालीन घराणीं

संपादक

श्रीयुत भिकाजीराजे बाळोजीराजे भोंसले - धार

फारशी लेखांचे अनुवादक

श्री. गोपाळ राजेश्वर पाडळकर

[ शिक्षक इंग्रजी शाळा चाळीसगांव व स्वयंसेवक सभासद रा. सं. मं. धुळें ]

प्रकाशक

राजवाडे संशोधन मंडळ, धुळें

ग्रंथाचे सर्व हक्क प्रकाशकानीं आपले स्वाधीन ठेविले आहेत.

शके १८६८ ] [ इ. स. १९४६

किंमत ६ रुपये

डॉ. म. म. द. वा. पोतदार,

मुद्रकः—नीळकंठ भास्कर भट
संपादक प्रबोध
धुळें

मुद्रण स्थळः—आत्माराम छापखाना
गल्ली नंबर २, घर नंबर १२
धुळें

प्र ।८५५

प्रकाशकः—भास्कर वामन भट
चिटणीस,
राजवाडे संशोधन मंदिर, धुळें

# अनुक्रमणिका


| विषय | पृष्ठ |
| --- | --- |
| १ श्री. भिकाजीराजे यांचें संपादकीय निवेदन | १–१९ |
| २ राजवाडे मंडळाचें निवेदन .... .... .... | २०–३५ |
| ३ भोंसले घराण्याची वंशावळ .... .... .... | २ |
| ४ श्रीमंत भिकाजीराजे भोंसले यांचे ऐति. लेख लेखांक १ ते १४५ | ४ ते २०५ |
| ५ श्रीमंत शिवाजीराजे भोंसले यांचे ऐति. लेख लेखांक १ ते १६ | २०७–२१४ |
| ६ श्रीमंत शिवाजीराजे भोसले यांचे ऐ. फारशी लेख .... | २१५–२६६ |





कै. म. म. द. वा. पोतदार,
ग्रंथ संग्रह

फ. म. म. द. वा. पोतदार
9853
954.731 Bho
61- 3194

# संपादकीय निवेदन

( लेखक – श्री. भिकाजीराजे बाळोजीराजे भोंसले – धार )

महाराष्ट्राच्या इतिहासांत प्रसिद्ध असलेले शिवछत्रपतीचे पूर्वज मालोजीराजे व विठोजीराजे भोंसले हे सर्वांच्या परिचयाचे आहेतच. या बंधुद्वयापैकीं विठोजीराजे यांस आठ मुलें होतीं. त्यापैकीं साहवे चिरंजीव परसोजीराजे यांचे वंशज नांदणज इलाखा मोंगलाई व भांबोरें जि. अहमदनगर या गांवीं राहातात. या घराण्याचे संग्रहांत जे जुने कागद उपलब्ध झाले ते आम्ही धुळें येथील राजवाडे संशोधन मंडळाकडे प्रसिद्ध करण्यास दिले. ते मंडळाच्या ग्रंथमालेपैकीं मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड २१ वा म्हणून स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रकाशित होत आहेत.

तज्ज्ञ इतिहाससंशोधकांनीं इतिहाससंशोधनास उपयोगीं पडणारीं साधनें जीं ग्राह्य धरलीं आहेत त्यांत तत्कालीन ऐतिहासिक पत्रांस फार मोठें व विश्वसनीय स्थान दिलें आहे. अशा प्रकारचीं नानाविध विषयांसंबंधांचीं पत्रें ज्या ज्या घराण्यांत संग्रहित केलेलीं असतात तीं इतिहासरचनेस मोठीं उपयुक्त असतात. अस्सल पत्रांसारखें अन्य इतिहाससाधन इतिहासरचनेस तितकें उपयोगीं पडत नाहीं.

भोंसल्यांचें घराणें भरतखंडाचे मध्ययुगीन इतिहासांत प्रसिद्ध असून या घराण्याचे पूर्वज उत्तरहिंदुस्तानांतील चितोडचे प्राचीन घराण्यांतून निघून दक्षिण महाराष्ट्रांत बहामनी राज्याच्या स्थापनेच्या सुमारास आले असें अलीकडे उपलब्ध झालेल्या ऐतिहासिक साधनांवरून दिसून येतें ( मुधोळ संस्थानच्या घोरपडे घराण्याचा इतिहास व बखर ). हें प्रास्ताविक निवेदन मीं ज्या फारशी पत्रांसंबंधीं लिहिलें आहे तीं पत्रें आमच्या घराण्यांतील गेल्या नऊ पिढ्यांतील पूर्वजांनीं संभाळून ठेविलीं आहेत. यामुळें तीं पत्रें प्रकाशित करण्याचा योग आला. या संग्रहांत दोन प्रकारचे लेख आहेत. एक वतनबाबी संबंधाचे व दुसरे अस्सल पत्रव्यवहाराच्या स्वरूपाचे.

अस्सल पत्रव्यवहाराचे लेख भांबोरें येथें दीर्घ प्रयत्नांतीं इ. स. १९१५ सालीं आम्हांस उपलब्ध झाले. या सर्व लेखांचीं सहा दप्तरें अस्ताव्यस्त पडलीं होतीं. तीं आमचे हातीं येतांच त्यांची आम्ही तपासणी केली. तेव्हां या दप्तरांत घड्या केलेले फारसी लेख, एकावर एक चिकटलेले मोडी लेख आणि हस्तलिखित कांहीं पोथ्या उपलब्ध झाल्या. त्यांतील कागदांचा कांहींचा वरचा तर कांहींचा खालचा भाग नाहींसा झालेला, कांहीं मध्येंच फाटलेले, कांहीं पाण्यानें भिजलेले व कांहींना उधई लागून खराब झालेले असे कागद आढळण्यांत

फ. म. म. द. वा. पोतदार
ग्रंथ संग्रह

आले. याच सुमारास या उपलब्ध झालेल्या कागदांबद्दल मी एक संशोधवृत्त लिहून तें इ. स. १९१२ सालीं भारत इतिहास संशोधक मंडळ पुणें यांजकडे प्रसिद्धीकरतां पाठविलें. तें त्यांनीं मंडळाचें त्रैमासिक वर्ष २ अंक १-४ यांत प्रसिद्ध करून शेवटीं आपला अभिप्राय त्याच अंकांत दिला आहे. यानंतर “ भांबोरकर भोंसले घराण्याची संक्षिप्त हकीकत ” या मथळयाखालीं मीं एक निबंध लिहून तो मंडळाकडे पाठविला. तो त्यांनीं मंडळाचें सप्तम संमेलनवृत्त शके १८४१ यांत प्रसिद्ध केला आहे.

जुन्या ऐतिहासिक कागदपत्रांच्या संशोधनाची आवड इतिहासाचार्य राजवाडे यांनीं प्रसिद्ध केलेलें ऐतिहासिक वाङ्मय वाचीत असतां मला उत्पन्न झाली. भोंसल्यांचें घराणें शौर्यपराक्रमांत अग्रगण्य आहे. अशा घराण्याचे जुने लेख इतर ऐतिहासिक घराण्यांच्या उपलब्ध झालेल्या लेखांप्रमाणें आपल्याही घराण्यांत सांपडण्याचा संभव आहे असें आमच्या मनांत येऊन या लेखांचें संशोधन करावें असें आम्हांस वाटलें. त्याप्रमाणें उपलब्ध झालेले ऐतिहासिक लेख तज्ञ संशोधकांस दाखवून शेवटीं ते प्रकाशित करण्यास्तव राजवाडे सं. मंडळाचे स्वाधिन केले.

या ग्रंथांत प्रसिद्ध केलेले वतनबाबीचे लेख निवापलीकडे संभाळून ठेवण्याची काळजी आमचे घराण्यांतील लोक पूर्वींपासून घेत आले आहेत. याचें कारण ते लेख आमच्या वतनासंबंधीं बादशाहांनीं दिलेल्या सनदा, पाटीलकीचे कागद, शाहूमहाराजांचीं राजपत्रें व आज्ञापत्रें आणि वंशावळी वगैरे स्वरूपाचे महत्त्वाचे कागद आहेत. आमचे वडील हयात होते तोंपर्यंत या दप्तरांतील कागदांची अफरातफर मुळींच झाली नाहीं. कारण या दप्तरास ते स्वतःशिवाय दुसऱ्या कोणास मुळींच हात लावूं देत नसत. कोर्टकचेरींत जरूर पडेल तेव्हां ते लेख स्वतः जातीनें कचेरींत हजर करीत व परत आणीत.

इ. स. १८८१ सालीं हैदराबाद संस्थानांत इनामकमिशनची चौकशी सुरू झाली. त्या वेळीं नांदणज हा गांव आमचेकडे पूर्वींपासून इनाम आहे याबद्दल सनदा दाखल करण्याविषयीं लिहून आलें. त्यावरून कागद घेऊन आमचे वडील नांदणजेस गेले. कचेरीचें काम होतांच परत आल्यावर भाऊबंद मंडळीच्या मनांत हे कागद जबरदस्तीनें हिसकावून घेण्याचा विचार आला, व कागद न दिल्यास त्यांना अटक करून ठेवावें असें ठरलें. ही प्रतिकूल परिस्थिति निर्माण झालेली पाहून त्यांनीं एके दिवशीं कागद कमरेस बांधले व विनाखोगराचे घोड्यावर स्वार होऊन घोड्यास पाणी पाजून परत आणतों या निमित्तानें अस्तमानीं घोडा गांवाबाहेर काढला

व त्यास तीव्र गति देऊन कोठेंही न थांबतां रात्रभर १८ कोस जमीन चालून सूर्य उगवतांच भांबोरें मुक्कामीं ते सुरक्षित येऊन पोंचले. त्यामुळें श्रम फार झाले. तीन दिवस जाग्यावर पडून होते. इतकें श्रमसाहस करून ज्यांनीं कागद संभाळून ठेविले तेच कागद त्यांच्या आत्मजांस पाहावयास मिळूं नयेत, हें आश्चर्य नसून हा विमल अंतःकरणाचा अभाव होय. असो. या दप्तरांतील एकंदर कागद माझे पाहाण्यांत इ. स. १९१४ सालीं पूर्णपणें आले होते; पण त्या वेळीं मीं विद्यार्जन करीत असल्यानें माझ्या दृष्टीची तयारी आजच्या सारखी झाली नव्हती. त्यामुळें मला ते कागद त्या वेळीं ऐतिहासिक दृष्टीनें पाहतां आले नाहींत. पुढें हें दप्तर माझे मुळींच पाहाण्यांत आलें नाहीं. सध्यां या दप्तरचे सर्व कागद शिवाजीरावराजे भोंसले यांजपाशीं आहेत. त्यांपैकीं त्यांनीं कांहीं मोडी कागद प्रकाशित करण्यास दिले आहेत, पण फारशी कागद अद्याप राजवाडेमंडळास त्यांचेकडून मिळाले नाहींत. माझी त्यांना आग्रहाची सूचना आहे कीं, ते कागद त्यांनीं जरूर राजवाडेमंडळास प्रकाशित करण्यासाठीं द्यावेत. यांत त्यांचा थोरपणा आहे. त्यांचे अंगीं स्वाभाविक रीतीनें वसत असलेला मोठेपणा हे वडिलार्जित कागद छापून भांबोरकर भोंसल्यांचा दर्जा प्रकाशित करण्यांतच व्यक्त होणार आहे. हें दप्तर आतां सुज्ञांनीं अप्रकाशित ठेवण्यांत कांहीं महत्त्व नाहीं. कारण या कागदांचें महत्त्व इनामचौकशी सुरू होण्यापूर्वी जें होतें तें आज नाहीं व इतिहासदृष्ट्या जें आज आहे तें पुढें राहाणार नाहीं. कारण दरसाल संशोधन होऊन अपरिचित कागद प्रकाशांत येत आहेत. त्यामुळें हे कागद आज आपलेकडून प्रसिद्ध झाल्यास त्याचें श्रेय आपणांस मिळणार आहे, तेंच कदाचित् दुसऱ्यास मिळेल. यांत उपयोग काय ?

अशा प्रकारचे शिवकालीन पत्रसंग्रह महाराष्ट्रांत बऱ्याच ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येतात. पण त्यांचे रक्षक सुशिक्षित व कुलाभिमानी असे फार थोडेच असल्याचे दिसतात. कित्येकांना खुळ्या कल्पनेची बाधा झालेली असल्यानें त्यांना असें वाटतें कीं, जर कागद प्रकाशांत आणले तर इष्ट साध्य होण्याऐवजीं कांहीं अनिष्ट परिणाम तर होणार नाहीं ! याप्रमाणें संकल्पविकल्पाचे तरंगांत गुरफटून संशोधकांस आशाबद्ध करून टाकतात. असे कटु अनुभव पुष्कळ ठिकाणीं येत असल्यानें सोन्यासारख्या जुन्या लेखांस विनाकारण धूळ खात पडावें लागतें ! याजकरितां एके ठिकाणीं ग्रंथांनीं ईश्वराजवळ प्रार्थना केली कीं, आमचें रक्षण खालील श्लोकांत वर्णन केल्याप्रमाणें चार ठिकाणांहून करावें.

तैलाद्रक्षेज्जलाद्रक्षेद्रक्षेच्छिथिलबंधनात् ।
मूर्खहस्ते न दातव्यं एवं वदति पुस्तकः ॥

या चार ठिकाणांहून जर कागदांचें रक्षण झालें तर ते कागद सहज सुज्ञाचे हातीं लागले असतां त्यांचा सदुपयोग झाल्याचें अनुभवास येतें.

जुन्या कागदपत्रांचा संग्रह कित्येक भोंसल्यांचे घराण्यांत आजही आहे. पण हीं भोंसल्यांचीं घराणीं पैठणचे तीर्थोपाध्ये कावळे यांचे दप्तरांतील यजमानपणाच्या नोंदवह्यांत सवाशें गांवीं असल्याची नोंद आहे. ह्या नोंदींत दाखल असलेलीं सगळीं भोंसल्यांचीं घराणीं छत्रपतींच्या पूर्वजांचे वंशजांपैकीं आहेत असें समजण्याचें कारण नाहीं.

मालोजीराजे यांस दोन मुलें. शहाजी व स्वरूपजी (शरीफजी). यांचे वंशजांचीं मूळ वास्तव्याचीं गांवें सातारा, कोल्हापूर, तंजावर, खनवट, जिंती, राशीन व शेडगांव इत्यादि आहेत.

दुसरे विठोजीराजे, यांचे आठ मुलांपैकीं सध्यां मालोजी, खेलोजी, नागोजी व परसोजी या चारच मुलांचा वंश चालत आहे. यांचे मूळ वास्तव्याचीं गांवें मुंगी, बनसेंद्रें, वावी, मंजीर, मनरथ, निगुंडी, सिंगणापूर, कळसकोल्हाळें, नांदणज व भांबोरें इत्यादि आहेत. हीं सर्व गांवें खानदेश, वऱ्हाड, नगर, पुणें, सोलापूर व इलाखा मोंगलाई इतक्या प्रदेशांत आहेत. या गांवीं उपलब्ध होणारे ऐतिहासिक लेख शिवकालीन व शिवपूर्वकालीन आहेत. हे लेख छत्रपतींच्या पूर्वजांचा मुळापासून संगतवार सांगोपांग इतिहास लिहिण्यास उपयोगीं पडणाऱ्या साधनांपैकीं एक मुख्य साधन आहेत. वास्तव या गांवांतील भोंसलेघराण्याच्या संग्रहांतील ऐतिहासिक लेखांचें संशोधन व प्रकाशन होणें जरूर आहे. त्यांपैकीं मुंगीकर भोंसल्यांचे कांहीं ऐतिहासिक लेख इतिहाससंग्रह पुस्तक ८ यांत प्रसिद्ध झाले आहेत, व कांहीं जिंतीकर भोंसले यांचे कागद शिवचरित्रसाहित्य खंड २ यांत प्रसिद्ध झाले आहेत, व भांबोरकर भोंसल्यांचे दप्तरीं सांपडलेलीं कागदपत्रें राजवाडे संशोधन मंडळाकडून प्रसिद्ध होणाऱ्या संशोधक त्रैमासिकांत मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड २६ वा म्हणून स्वतंत्र पुस्तकरूपानें सध्यां छापलीं आहेत. एकंदरींत तीन घराण्यांचे कागद आतांपर्यंत प्रकाशित झाले आहेत, व बाकी राहिलेल्या घराण्यांतील पुरातन लेख उपलब्ध झाले नाहींत तोंपावेतों भोंसले घराण्याचा, त्याचप्रमाणें महाराष्ट्राचा इतिहास पूर्णरूपानें मूर्तस्वरूपांत येणें अशक्य आहे. कारण भोंसलेघराण्याचा इतिहास म्हणजेच महाराष्ट्राचा इतिहास असें समीकरण आहे.

इ. स. १९१८ सालीं हा संग्रह धार येथील सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक पंडित कै. का. कृ. लेले यांनीं पाहिला व हे कागद फार उपयोगाचे आहेत असें पाहून धार सरकारमार्फत हे कागद छापून काढावे असा प्रयत्न केला, पण येथें कोणी चांगला फारशी जाणणारा न मिळाल्यामुळें हें काम घडून आलें नाहीं.

इ. स. १९२२ सालीं हा संग्रह बडोद्याचे प्रसिद्ध इतिहाससंशोधक रा. ब. गोविंद सखाराम सरदेसाई यांनीं पाहिला व हा संग्रह फार महत्त्वाचा आहे असा लेखी अभिप्राय दिला, व प्रो. यदुनाथ सरकार यांजकडून प्रकाशित करवितों असें त्यांनीं आश्वासन देऊन अस्सल कागद कलकत्त्यास पाठवावे लागतील असें सांगितलें. ती गोष्ट मला मान्य झाली नाहीं.

इ. स. १९३० सालीं धार येथील श्री. प्रो. वाकणकर यांचे दप्तरचे कागद ग्वाल्हेरचे सरदार इतिहासप्रिय आनंदराव भाऊसाहेब फाळके छापीत असतां त्यांना आमच्या जवळच्या जुन्या लेखांची माहिती मिळाली. त्यावरून त्यांनीं स्वतः धारेस येऊन माझी भेट घेतली. संग्रह पाहून ते फार खूश झाले, व हे सर्व कागद आम्ही आपले खर्चानें छापवून ५० प्रती बक्षिसादाखल तुम्हांस देऊं असें ते म्हणाले. त्याप्रमाणें कामास सुरुवात होऊन नकला ग्वाल्हेरीस गेल्या पण कांहीं अपरिहार्य कारणामुळें तें काम स्थगित झालें !

इ. स. १९३४ सालीं मुधोळच्या राजेसाहेबांनीं पुण्याच्या भा. इ. सं. मंडळास एक मोठी देणगी दिली व त्यांत शर्त घातली कीं, या रकमेचा व्यय शिवकालीन पत्रें छापून प्रकाशित करण्याकडे करावा. हें आम्हांस माहित झाल्यावर आम्हीं मंडळाकडे याबाबत तपास केला. त्यावर त्यांनीं अस्सल कागद घेऊन आम्हांस पुण्यास बोलाविलें. त्याप्रमाणें आम्हीं पुण्यास जाऊन लेख दाखविले. त्यांचे त्यांनीं फोटोझिंको आफिसमध्यें फोटोही घेतले व आश्वासन दिलें कीं, हे कागद लवकरच प्रसिद्ध होतील. बरेच दिवस वाट पाहिली, परंतु कागद प्रसिद्ध झाल्याचें दिसून न आल्यामुळें ते कागद अन्य मार्गानें प्रसिद्ध करणें आम्हांस भाग झालें.

इ. स. १९३७ सालीं माझा राजवाडेमंडळाशीं परिचय झाला व लगेच मंडळाचे उत्साही कार्यकर्ते श्री. भास्कर वामन भट यांची धुळयास जाऊन मीं भेट घेतली. त्या वेळीं उभयपक्षीं ठराव होऊन हे लेख प्रसिद्ध करण्याचें कार्य हातीं घेण्याचें ठरलें, व मंडळाचें त्रैमासिक संशोधक यांत क्रमशः लेख प्रकाशित होऊं लागले, व हें काम लवकरच पूर्ण होऊन संपेल अशी उमेद दिसूं लागली. याप्रमाणें फारशी कागदांचा संग्रह प्रकाशित होऊन हें अर्धें अधिक काम हातावेगळें होत आहे हें पाहून माझ्या मनास मोठें समाधान होत आहे.

# लेखपरिचय.

या संग्रहांत इ. स. १६३६ पासून १७०७ पावेतोंचे कागद आहेत. त्यांत भांबोरकर भोसले घराण्यास मिळालेलीं वतनें, इनामें, जहागिरी यांच्या सनदा व कांहीं तत्कालीन पत्रव्यवहार आहे.

लेखांक १ – यांत खान जमानचे शिफारसीनें परगणे जळगांवजामोद प्रांत वऱ्हाड येथील पूर्वीचा देशमूख गंगाजी या नांवाचा होता. त्यानें परगण्यांत फार लोकांवर जोरजुलूम केल्यानें परगणा ओस पडला. त्याजकडून तो परगणा दूर करून तो परसोजी राजे यांस दिला. तेव्हांपासून पुढें त्या परगण्याची वसाहत होऊन जमिनीची लागवड पूर्वीपेक्षां दुप्पट झाली व लोक सुखानें राहूं लागले याजबद्दल सनद आहे. या संग्रहांत परसोजी राजे यांचीं फारच थोडीं पत्रें सांपडतात, पण इतर ठिकाणीं त्यांचे उल्लेख बरेच जागीं आले आहेत. शाहाजी राजे तंजावरास गेले त्या वेळीं त्यांनीं परसोजी राजे यांस भालोरी हा गांव तैनात लावून दिला असा उल्लेख शिवदिग्विजय या ग्रंथांत आला आहे. रामेश्वरभट अरवीकर यांनीं ताबाऊ साहेबांची ठेव खडकीस आणून विठूजींचे मुलास दिली त्याबद्दल जी पावती लिहून घेतली तींत याचें नांव आहे.

निजामशहाची राजधानी मलिकंबरनें खडकीस आणून तो गांव नवीन वसविला. त्या वसाहतींत विठोजी राजाचे मुलांनीं पुष्कळ मदत केली होती. त्यामुळें त्यांनीं आपल्या नांवानें चार पुरे वसविले. त्यांत एक परसूपुरा या नांवानें चालत होता, असा उल्लेख मुंगीकरांचे उपाध्ये दीक्षित यांचे घरीं सांपडलेल्या लेखांत आला आहे. यांचे पराक्रम शहाजी राजे यांच्या तोडीचे होत होते, अशाबद्दल मलिकंबरनें कांहीं ठिकाणीं उल्लेख केला आहे. यांस मुलें तीन— सयाजी, जयसिंगजी व शरीफजी. पैकीं सयाजी राजाचे नांवचीं पत्रें या संग्रहांत बरींच आहेत, पण जयसिंगजी व शरीफजी यांच्या नांवाचें एकही पत्र यांत नाहीं. मात्र आमच्या घराण्याच्या मराठी संग्रहांत या बंधुद्वयाचीं दोन पत्रें सांपडतात. लेखांक २ पासून सयाजी राजे यांच्या नांवाचे पत्रव्यवहारास सुरुवात होते. यांत विविध विषयांवर पत्रें आलेलीं आहेत. त्यांत कांहीं सनदा, ताकीदपत्रें, कबुलायती व खासगी पत्रें सांपडतात. त्यांवरून त्यांचे अंगचें शौर्य, पराक्रम, रुत्बा ( दर्जा ), मानमरातब, हुकमत, अमलबजावणी, स्वभाववर्णन, राजमान्यता व वार्षिक उत्पन्नाचा आढावा काढतां येण्यासारखी माहिती मिळते. यांच्या नांवचीं पत्रें फार करून फारशी संग्रहांतच सांपडतात. मराठींत एकही सांपडत नाहीं. सयाजीराव यांचे नांवच्या पत्रांस ले. २ पासून आरंभ होतो.

ले. २-३ मध्यें बादशाहानें आपल्या खासगी गांवांपैकीं परगणे माहूर हा परगणा सयाजीराव यांस जागीर दिल्याचा उल्लेख आहे.

ले. ५ मध्यें वऱ्हाड प्रांतांतील जळगांव जामोदची देशमुखी वडिलांच्या नंतर याचे नांवें चालू ठेवण्याबद्दल उल्लेख आहे. या परगण्यांत त्यांनीं आपलेकडून दावल वल्लद आदमखां यास काम करण्यास नेमून दिलें होतें. परगण्याची स्थिति जी गंगा बाघ या नांवाचा पूर्वींचा देशमूख याचे गैरवर्तनामुळें व जोरजुलमामुळें बिघडली होती ती यांनीं लोकांस दिलासा देऊन वसाहत करून सुधारून घेतली.

ले. ८ यामध्यें यांनीं बाळापूर अकोल्याचे परगण्यांत जागोजाग बंडें होत होतीं. त्या बंडखोर लोकांचा मोठ्या धाडसानें बीमोड करून बंदोबस्त केला. त्याबद्दल यांना दोनशें स्वार खासगी व तीनशें स्वारांची मनसब देऊन पारनेर परगणा बादशहाकडून जागीर मिळाला. त्याबद्दल बादशहानें त्यांची फार तारीफ केली.

ले. ९ मध्यें परगणे कडेवळीत, जामखेड आणि आष्टी या प्रांतांत फौजदारी व अमीनाचे अधिकार यांस मिळाले. त्या वेळीं आरंभीं नान्दुणज या गांवीं येऊन कायमची वसाहत केली. या गांवास लागून एक नवीन कसब्याची पेठ वसवून तीस अलमगीरपूर असें नांव दिलें. त्यावरून त्यांना ह्या गांवची जागीर मिळाली. ती सनद शिवाजीराव भोंसले यांचे दप्तरीं सुरक्षित आहे. नवीन वसविलेल्या पेठेंत महाजनगिरी व शेटेगिरी असे दोन हक्क कायम करून महाजनगिरीचे जागीं दावलचा मुलगा अबदूल रजाक यास नेमिलें व शेटेगिरीच्या जागेवर स्वतःचा मुलगा राजरूप याची नेमणूक केली. हे दोन्ही हक्क अद्यापि चालत आहेत. यांचा अमल किती कडक व अधिकार किती पूर्ण होते याची कल्पना लेखांक १४ वरून सहज लक्षांत येते.

सरकारी वसूल तगादा करूनही वेळशीर येत नाहीं. यास्तव लोकांवर दहशत बसावी या हेतूनें मुशरफ बेग या नांवाचे इसमास जिवें मारून त्याचें प्रेत झाडास टांगून ठेविलें व नातेवाइकांनीं दफन करण्यास मागितलें असतां त्यांनाही अटकेंत ठेविलें वगैरे मजकूर पूर्ण अधिकाराची साक्ष देणारा आहे.

छत्रपतींचे मराठे सरदार मोंगलाईंत येऊन लूटमार करीत. त्या वेळीं त्यांच्याशीं यांचा पुष्कळ वेळां सामना झाल्याचे उल्लेख कित्येक पत्रांत येतात. यास दोन मुलें होतीं. वडील रुस्तुमजी व धाकटे राजरूप.

रुस्तुमजी व राजरूप या दोघांचे नांवचीं पत्रें या फारशी संग्रहांत बरींच आहेत. त्याचप्रमाणें मराठी संग्रहांतही पुष्कळ पत्रव्यवहार आहे पण

फारसीपेक्षां मराठी पत्रांची स्थिति बिघडली असल्यानें व लिपि जुनी मोडी असल्यामुळें तीं पत्रें समजण्यास फार कठीण जातें.

ले. ४६ यांत रुस्तुमजी व राजरूपराजे यांस वडिलांचे मार्गें बादशाहाकडून संगमनेर व जामखेड हे परगणे जागीर दिल्याचा उल्लेख आहे.

ले. ४८ यांत परगणे नाचणगांव सरकार कळंब सुभे वऱ्हाड हा भगवतसिंग याजकडून काढून राजरूप याजकडेस जागीर लावून दिला असा उल्लेख आहे.

लेखांक ४९ यांत वडिलांचे मार्गें राजरूप यास परगणे कडेवळीतची जागीर करून दिल्याचा उल्लेख आला आहे.

लेखांक ५७-५८ यांत मराठेशाहींतील सरदार संताजी घोरपडे यांनीं मोंगलाई इलाख्यांत स्वारी करून नान्दुणज हा गांव लुटला. त्याबद्दलची मनोरंजक माहिती देणारा रयतेचा अर्ज आहे.

लेखांक ७६ फार महत्त्वाचा असून तितकाच तो मनोरंजकही आहे. इ. स. १९२४ सालीं कलकत्त्याचे सर यदुनाथ सरकार धारेस आले होते. त्या वेळीं त्यांनीं हा संग्रह पाहिला असतां हें पत्र त्यांच्या नजरेस आणण्यांत आलें. तें पाहून ते फार खूश झाले. त्या वेळच्या कडव्या मुसलमान अमलदारींत इस्लाम धर्माच्या विरुद्ध इतक्या धाडसाचें काम करणारे पराक्रमी वीर विशेषतः महाराष्ट्रांतच दिसून येतात. अबदुल्ला यानें राजरूप दिल्हेरखांचे बरोबर स्वारींत फिरून त्याचे गांवीं गैरहजरीचा फायदा घेऊन भोंसले मंडळीच्या लोकांस हरतऱ्हेचा त्रास देऊन गांव उद्ध्वस्त केला व त्यामुळें लोक त्रस्त झाले. बारा वर्षांनंतर स्वारींतून राजरूप गांवीं परत आले. वस्ती उजाड होण्याचें कारण विचारलें. त्यावर अबदुल्ल्याचा प्रकार सांगण्यांत आला. त्यावरून संतप्त होऊन त्याचा मुलांलेंकरांसह शिरच्छेद केला व शिरें आपल्या दरवाजावर टांगून ठेविलीं. मशीद पाडून नमाज पढण्याचें बंद केलें, व दर्गा पाडून भ्रष्ट केला वगैरे मजकूर या पत्रांत आहे. त्यापूर्वीं अबदुल्ल्याचे जुलमाबद्दल रयतेचा फारसींत तपशीलवार अर्ज आमचेजवळ होता तो आम्ही इ. स. १९२१ सालीं भा. इ. सं. मंडळ पुणें यांजकडे त्रैमासिकांत प्रकाशित होण्याकरितां पाठविला. त्याचा अद्याप पत्ता नाहीं! तोही माहितीपूर्ण असाच आहे.

लेखांक ७९ ही महाजनगिरीची सनद आहे व ले. ८९ यांत कसबे नांदुणज येथील कुळकर्ण्यांचे वतनाबद्दल तंटा होता. त्यांनीं बहादुरगडास (पेडगांव) येथें वरिष्ठ कोर्टांत अर्ज केल्यावरून प्रताप नांवाचा स्वार गांवकरी

मंडळीस बोलावून नेण्याकरितां नांदुणज मुक्कामीं आला. मध्यरात्रीस त्याचा खून झाला. त्या प्रकरणाची चौकशी मोठी मनोरंजक आहे.

लेखांक ९१ यांत रुस्तुमजी राजे यांजकडे शेटेगिरीच्या वतनाबद्दल जमीन इनाम दिल्याचा खुलासा आहे.

लेखांक ९२, ९३ यामध्यें मराठ्यांच्या फौजांचे सरदार शंकऱ्या व हणवंत यांनीं अलमगीर पेठेस ६ हजार स्वारांनिशीं वेढा घालून खंडणीची मागणी केली व ती न दिल्यामुळें जबरदस्तीनें लोकांकडून कशी वसूल केली याची हकीकत दिली आहे. मराठ्यांनीं चालविलेल्या स्वातंत्र्य युद्धांत औरंगजेबच्या सैन्यास तोंड देण्याकरितां मोठमोठ्या फौजा महाराष्ट्रांतील निरनिराळ्या प्रदेशांत धुमाकूळ घालण्याकरितां बाळगाव्या लागत. या फौजा बाळगण्याकरितां लागणारा खर्च मोंगली प्रदेशावर स्वाऱ्या करून त्यांतील लोकांपासून जबरदस्त खंडणी वसूल करून ते भागवीत असत. याशिवाय फौजेचा खर्च भागविण्याचें अन्य साधन मराठ्यांपाशीं नव्हतें. ले. ९३ मध्यें मराठा फौजेच्या सरदारांचीं नांवें शंकऱ्या व हणवंत अशीं नमूद केलीं आहेत. मुसलमान तवारीख लेखक छत्रपती शिवाजी व संभाजी यांच्या नांवाचा उल्लेख शिवा व संभा या नांवानें करतात. या मुसलमानी पद्धतीस अनुसरून शंकऱ्या व हणवंत या नांवानें मराठा सरदारांचा उल्लेख या पत्रांत आढळतो. मराठ्यांचे हे सरदार कोण असावेत असेविषयीं आमचें अनुमान आम्ही येथें नमूद करतों. छत्रपती राजारामानें ता. २३ जानेवारी १६९० रोजीं शंकराजी नारायण यास सचीवपद दिलें व तेव्हांपासून मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धांत त्यानें फार मोठी कामगिरी केली. मावळांतील पुरातन देशमुख देशपांडे वतनदारांच्या साह्यानें मोंगलांचे ताब्यांत गेलेले सर्व किल्ले त्यानें परत काबीज केले. शंकराजी नारायण हा मोठा धाडसी व पराक्रमी असून हातीं घेतलेलें कार्य कोणत्याही युक्तीनें तो पार पाडण्यांत निष्णात होता. यावरून शंकऱ्या हें नांव शंकराजी नारायण सचीव याचें असणें संभवतें. हणवंत हा सरदार कोणता असावा असेविषयीं आमचें अनुमान येथें आम्ही नमूद करतों. राजारामकालीन स्वातंत्र्ययुद्धांत प्रामुख्यानें भाग घेणाऱ्या सरदारांत हणमंतराव घोरपडे व हणमंतराव निंबाळकर हे दोन प्रमुख होते. यांपैकीं या पत्रांत ज्या हणवंताचा उल्लेख आला आहे तो हणमंतराव निंबाळकर असावा असें आमचें अनुमान आहे. ता. १६ आगस्ट इ. स. १७०० त हणमंतराव निंबाळकरानें खटावचें ठाणें गांठलें व तेथील मोंगलांच्या तर्फेचा मराठा अधिकारी होता त्यास ठार मारिलें असा उल्लेख इतिहासांत आढळतो ( मराठी रियासत - स्थिरबुद्धि राजाराम पृ. ११६ ). यावरून या पत्रांतील

हणवंत हा हणमंतराव निंबाळकर असावा असें दिसतें. महाराष्ट्रांत औरंगजेबच्या सैन्याची लांडगेतोड करून त्यास सतावणारे जे त्या काळीं अनेक मराठे सरदार होते त्यांपैकीं हा एक होता. ले. ९२ फेब्रूवारी सन १७०० तला आहे, व रियासतींतील खटाव ठाणें लुटल्याचा उल्लेख त्याच सालचा आहे. अलमगीरपूर, नांदणज हीं गांवें नगर जिल्ह्यांत आहेत. या पेठेस व गांवास वेढा घालून तीं लुटल्यावर सातारा जिल्ह्यांतील खटावचे ठाण्यावर हणमंतरावानें हल्ला करून तें ठाणें सर केलें.

लेखांक ९४ हा राजरूप व रुस्तूम यांच्या तक्रारीविषयीं चौकशी करण्याबद्दलचा आहे. ले. ९५ मध्यें खेलोजी याचा उल्लेख असून त्याजला दरबारांत पाठविलें आहे. तरी त्याचेवर लक्ष ठेवून त्याची बढती करावी अशी राजरूपानें विनंति केली आहे. पत्रांत नुसतें नबाबसो असें म्हटलें आहे.

ले. ९६ हा राजरूप व महाजन अबदुल रजाक यांचा नांदणज येथील अलमगीरपूर पेठ मराठ्यांनीं लुटून बेचिराख केल्याचा मागील ले. ९२ व ९३ मध्यें जो उल्लेख आला आहे त्या पेठेंतील लोकांस जीवदान व अभय देण्याची या लेखांकांत विनंति आहे.

ले. ९७ कडेवळित परगण्याचा हक्क बहाल करण्याबद्दल सयाजीनें केलेली विनंति मान्य करावी अशेबद्दल बादशहास सयाजीनें विनंतिपत्र लिहिलें. ती विनंति मान्य करण्यांत आली आहे असें या पत्रांत सयाजीस कळविण्यांत आलें आहे. हें पत्र इ. स. १६६० च्या पूर्वीचें असावें असें अनुमान करण्यास वाव आहे. कारण, मागील ले. ९ ता. २ मार्च १६६० च्या लेखांत कडेवळीत परगण्याचे फौजदार व अमीन म्हणून सयाजी यास नेमण्यांत आलें आहे असा त्यांत उल्लेख आहे. त्यावरून लेखांक ९७ हा त्यापूर्वी म्हणजे २ मार्च १६६० च्या पूर्वीचा असला पाहिजे असें अनुमान करणें युक्त आहे.

ले. ९८ मध्यें मालोजीचा उल्लेख आहे. हें पत्र मालोजीनें लिहिलेलें असून त्यांत मौजे भांबोरें परगणे चांभारगोंदे हा गांव मालोजीच्या वतनांतील असलेला त्याचेकडून घेऊन त्याच्या ऐवजीं त्यास दुसऱ्या जहागिरींतील गांव देण्याची खटपट दुसऱ्या कोणीं इसमानें चालू केल्याचें मालोजीस समजल्यावरून त्यानें ही गोष्ट मान्य करण्यांत येऊं नये व भांबोरें गांव त्याचेकडेच ठेवण्यांत यावा असें या अर्जांत लिहिलें आहे.

ले. ९९ या पत्रांत परसोजी भोंसले यांच्या निधनाबद्दल दुःख प्रदर्शित केलें आहे. पत्राचे शेवटीं सय्यद महमदखान यानें पत्र लिहिलें असें नमूद

केलें आहे. पत्र कोणास लिहिलें त्याच्या नांवाचा उल्लेख पत्रांत नाहीं. नुसतें राजेसाहेब यांस असें नमूद आहे. सयाजीराजे हा परसोजीचा मुलगा होता यावरून हें पत्र त्यास लिहिलें असावें असें दिसतें. परसोजीच्या जहागिरी-इनामें सयाजीच्या नांवानें ज्या सालापासून करण्यांत आलीं त्यापूर्वी परसोजी निधन पावला असला पाहिजे हें उघड आहे. ले. १ हा ता. २८।८।१६३६ चा आहे. त्यांत जुने देशमूख गंगाजी यांस कमी करून जळगांव परगण्याची देशमुखी परसोजी अथवा त्याच्या मुलाच्या नांवानें नेमून दिली आहे असा उल्लेख ज्या अर्थी या पत्रांत आहे त्या अर्थी इ. स. १६३६ सालांत परसोजी हयात होता असें दिसतें. ले. २ ता. १६ दिसेंबर सन १६५२ चा आहे. माहुरी, सुभा वऱ्हाड येथील दिवाणीच्या सर्व बाबी सयाजी वल्लद परसोजी यास देण्यांत याव्यात असा देशमूख देशपांडे वतनदार इत्यादिकांना हुकूम दिल्याचें या पत्रांत नमूद आहे. यावरून इ. स. १६३६ ते १६५२ चे दरम्यान परसोजी निधन पावला असें दिसतें.

ले. १०० हें पत्र मिर्झा करीमबेग यास रकम रु. २०० दोनशें वसूल करून पाठविण्याबद्दल लिहिलेल्या पत्राचें उत्तर आहे.

ले. १०१ ते १०६ हे सामान्य स्वरूपाचे आहेत. ले. १०७ मौजे मंगूर परगणे असीरच्या जहागिरीच्या उत्पन्नाबद्दलचें आहे. ले. १०८ ते ११५ व ११७ व ११९ हीं सामान्य स्वरूपाचीं पत्रें आहेत. यांत विशेष महत्वाचें असें कांहीं नाहीं. ले. ११६ हें पत्र राजे रुस्तूम यास त्यांच्या कोणा वडील नातेवाइकानें लिहिलेलें दिसतें. रुस्तुमपासून घेतलेल्या कर्जाच्या फेडीविषयींचा मजकूर या पत्रांत आहे. ले. ११८ हें पत्र मिर्झा फैजबेग यास लिहिलें असून त्यांत पत्र लिहिणाराच्या मुलांची शिफारस करून त्यांस बादशाही सैन्यांत दाखल करून घेण्यांत यावें असा मजकूर आहे. ले. १२० हें पत्र जजीया कर वसूल करणाऱ्या अधिकाऱ्याचें आहे. तो कर वसूल करणारा अधिकारी गांवास येणार असें समजतांच तेथील लोक अस्वस्थ होऊन गांवांतून पळून जात असें या पत्रावरून दिसतें. हा कर वसूल करण्याचा हुकूम बादशाहाचा आहे व त्यास अनुसरून तो द्यावा लागेल अशी समज गांवांतील लोकांस देण्याबद्दल या पत्रांत उल्लेख आहे. औरंगजेबानें इ. स. १६७८ सालांत हा कर प्रजेकडून वसूल करण्याचा फिरून हुकूम केला व त्या हुकमाअन्वयें हा कर वसूल करण्यास सुरुवात झाली ही गोष्ट लक्षांत घेतां हें पत्र इ. स. १६७८ सालांतलें असावें असें दिसतें.

ले. १२३ हा परसोजी भोंसल्याचा बादशाहास अर्ज आहे. बादशाहाच्या नांवाचा यांत उल्लेख नाहीं परंतु कोणत्या बादशाहाकडे हा अर्ज परसोजीनें केला असावा याविषयींचें अनुमान काढण्यास वाव आहे. निजामशाही १६३६ त अस्तंगत झाली. त्यानंतर हा अर्ज परसोजीनें मोंगल बादशाहाकडे तो बादशाहा निजामशाही मुलखाचा मालक झाल्याकारणानें त्याचेकडे केला. या अर्जांत " बादशाहा सलामतच्या राज्यारोहणापासून मैत्रीचे संबंध ठेवणार आहे आणि सरकारांतून व दरबारांतून मानमान्यतेचा उपभोग घेत आहे " असे शब्द आहेत. त्यावरून निजामशाही अस्त पावल्यावर दिल्लीचा बादशाहा शहाजहान याजकडे हा अर्ज परसोजीनें केला आहे.

ले. १२४ हा सयाजी भोंसले यानें दिल्लीच्या बादशाहास केलेला अर्ज आहे. या अर्जांत बाळापूर परगण्याची फौजदारी सयाजीस दिल्यावर त्या प्रदेशांत तुक्या नांवाच्या डाकूनें सैन्य बाळगून त्या परगण्यांत धुमाकूळ घालवून लोकांस सतावून सोडलें होतें. त्याचा बींमोड करून त्या प्रदेशांत शांतता केल्याबद्दलची हकीकत सयाजीनें नमूद केली आहे व बादशाहानें दिलेल्या वचनास अनुसरून त्याची बढती करावी अशी विनंति सयाजीनें केली आहे. तुक्याचा बींमोड करण्याकरितां सयाजीस सैन्य ठेवावें लागलें. तें कायम आहे व बादशाहा आज्ञा करतील ती कामगिरी करण्याची व बादशाहाची आज्ञा होईल त्या मोहिमेवर सैन्यासह कूच करण्यास तयार आहें असें सयाजीनें बादशाहास या पत्रानें कळविलें आहे. पत्राचे शेवटीं ' या सेवकाचा वशिला नाहीं. त्याजवळ फक्त शौर्य आहे व त्याचा सर्व आधार तेंच आहे ' असें सयाजीनें नमूद केलें आहे. यावरून सयाजी हा मोठा पराक्रमी योद्धा होता असें दिसून येतें.

ले. १२५ व १२६ सामान्य स्वरूपाचे आहेत. ले. १२७ त सरदार नारायण याचा अर्ज आहे. या अर्जांत मराठ्यांनीं बादशाही मुलखावर ५।६ हजार सैन्यानिशी स्वारी पळसदेव व राशीन मार्गानें केल्याचें लिहिलें आहे. तिच्या प्रतिकाराची योजना कोणच्या प्रकारची करावी याबद्दलची हकीकत या पत्रांत आहे. " शत्रूचें सैन्य बादशाही सेवकांच्या सैन्याच्या आगमनाची बातमी ऐकून पळूं लागलें व तें नांदुणजच्या ठाण्याच्याही पलीकडे निघून गेलें " असा उल्लेख आहे. नांदुणज व अलमगीरपूर पेठ मराठ्यांच्या सैन्यानें सन १७०० सालांत लुटल्याची हकीकत मागील लेखांकांत दिली आहे. यावरून या पत्रांतील हकीकत इ. स. १७०० सालच्या सुमारास घडल्याचें दिसतें.

ले. १२८ हा राजरूपचा वकील महंमद याचा अर्ज आहे. नांदणज पेठेवर मराठ्यांनीं हल्ला करून ती उद्ध्वस्त केल्यावर खान फरोजजंग यांनीं मराठ्यांच्या फौजेवर स्वारी केली व तेथें फौज ठेवून पेठेंत वस्ती करावी व तेथील लोकांस घास व रसद माफ करण्यांत आली आहे असें जाहीर केलें. याप्रमाणें हुकूम झाला असतां देशमूख देशपांडे वतनदार गवत व कडबी लोकांकडून वसूल करतात अशी तकरार केली आहे. इ. स. १७०० सालांत नांदणज पेठ लुटली त्या सुमाराचें हें पत्र दिसतें.

लेखांक १२९ या पत्रांत राजरूप साहेबाची काळजी घरच्या माणसा-प्रमाणें घेण्यांत येते असें पत्र लिहिणारानें लिहिलें आहे. हें पत्र रुस्तुमजीनें राजरूपच्या वडील भावास लिहिलेलें दिसतें.

ले. १३० हें पत्र रुस्तुमजी याच्याहून वडील असलेल्या माणसानें त्यास लिहिलेलें दिसतें. पत्रांत रुस्तुमच्याविषयीं जें प्रेम दर्शविलें आहे त्यावरून तें सयाजीनें लिहिलें असावें, असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. या पत्रांत " तुमचें पत्र ज्यांत हत्तीची हकीकत तुम्ही लिहिली होती तें पोंचलें ... ... माझ्या बाबा तुला खरोखरच अधिक काळजीनें वागलें पाहिजे. जेव्हां तुम्हांस सवड होत जाईल तेव्हां तुम्ही दुसरीकडे कोठें जाऊं नये " असे शब्द नमूद आहेत. यावरून हें पत्र काय बाबतचें असावें याविषयीं संभाव्य अनुमान आम्ही येथें नमूद करतों. बादशाही राजवटींत खास बादशाहा, त्याचप्रमाणें त्याचे मोठमोठे सरदार हत्ती बाळगीत. अशा हत्तींपैकीं एखादा हत्ती मस्त होऊन लोकांत सैरावैरा पळून दाणादाण उडवून देतो. याप्रमाणें होणाऱ्या दाणादाणींत कित्येक लोक हत्तीखालीं सांपडतात. कित्येकांस हत्ती सोंडेंत पकडून जमिनीवर हापटतो. अशा मस्त झालेल्या हत्तीस हातांत भाला अगर तरवार घेऊन चढाई केल्यास तो आटोक्यांत येऊं शकतो. रुस्तुमजीनें अशा प्रकारचें धाडस हत्तीवर चाल करून केल्याची हकीकत सयाजीस कळविल्या-वरून त्यानें असें धाडस न करण्याविषयीं मायेनें रुस्तुम यास या पत्रांत उपदेश केल्याचें दिसतें.

लेखांक १३१ हें पत्र महत्वाचें आहे. पत्रांत साल, महिना, तारीख नमूद नाहीं. हें पत्र सयाजीराजे यास लिहिलें आहे. मराठ्यांच्या फौजांनीं चोंडाघाट ओलांडून संगमनेरच्या आसपास बादशाही मुलखांत लूटमार सुरू केल्याचें पत्र लिहिणारानें सयाजीस कळविलें आहे. बादशाही सरदार कुतुबुद्दीन यानें मोंगली फौजांसह त्यांचेवर हल्ला चढविला व मराठा सैन्य पळूं लागलें. त्यांपैकीं कांहीं लोक सांपडले त्यांस ठार केलें असें पत्र लिहिणारानें कळविलें

आहे. मोठ्या फौजेनिशीं मराठ्यांचा पाठलाग करण्यांत येत आहे. तरी सयाजी चार परगण्याचे फौजदार असल्याकारणानें शत्रूच्या हालचालींची वार्ता तुम्हांस मिळते तीं, त्याचप्रमाणें मिळणारी माहिती मुद्दाम हत्तीस्वाराबरोबर तावडतोब पाठवीत जावी असें पत्र लिहिणारानें सयाजीस कळविलें आहे.

लेखांक १३२ हा सयाजीच्या निधनाविषयीं दुःख व्यक्त करणारा लेख आहे, परंतु या लेखांत साल, महिना, तारीख नमूद नाहीं.

ले. १३३ हा लेख फार महत्वाचा आहे. यांतील महत्वाच्या गोष्टींचा अल्प निर्देश करितों.+ परसोजीचा मुलगा× सयाजी भोंसले यानें त्याचें जहागिरीस नांव दाखल झाल्यावर नांदुणज गांवाचें महत्त्व वाढविण्याकरितां इ. स. १६५८ सालानंतर पेठ वसविली व त्या वेळचा बादशाहा औरंगजेब ऊर्फ अलमगीर याचें नांव पेठेस दिलें. ही पेठ त्यानें वसविली ते वेळीं त्याचा कारभारी (पेशकार) दावल या नांवाचा मुसलमान होता. सयाजीची त्याचेवर विशेष मर्जी असावी असें दिसतें. कारण त्यानें या पेठेंतील सावकारी स्वतःचा मुलगा राजरूप व महाजनगिरी दावलचा दुसरा मुलगा अबदूल रजाक याचे नांवची केली. त्यानंतर दावलचा मुलगा अबदुल्ला यानें बादशाहाकडून बरीच जमीन इनाम मिळविली. (लेखांक ७९ पहा). याशिवाय बादशाहाकडून कांहीं जहागीरही मिळविली (ले. ६४ व ६६ पहा). याप्रमाणें बादशाहाकडून मिळालेल्या जमिनी व जहागिरी यांचें उत्पन्न, त्याचप्रमाणें पेठेच्या महाजनगिरीचें उत्पन्न त्याजला मिळूं लागल्यामुळें अबदुल्लाची सांपत्तिक स्थिति उत्कृष्ट होऊन त्याची वजनदारी वाढली. अबदुल्लाच्या या प्रकारच्या सांपत्तिक स्थितीमुळें त्यानें पेठेंत हवेल्या बांधल्या. याशिवाय त्यानें गांवांतील वतनदार लोकांस राहण्याकरितां एक गढीही बांधली व एक मोठा बाग तयार केला. सन १६८०।८१ सालचे सुमारास सयाजी निधन पावला. त्यानंतर वजनदारी वाढल्यामुळें अबदुल्ला पेठेंत वरचढपणा करूं लागला व सयाजीचे मुलगे रुस्तुमजी व राजरूप यांच्याशीं त्याचा विरोध उत्पन्न होऊन त्या उभयतांत तंटेबखेडे होऊं लागले व अखेर सरकारदरबारांत व वरिष्ठ

---

+ या पुढील कथन या खंडांतील लेखांक ६४, ६६, ७४, ७६, ७८, ७९, ८१ यांतील माहितीचे आधारें केलें आहे.

× या पत्राचा संदर्भ लक्षांत घेतां या शब्दाचें वाचन चुकीचें झालें आहे. 'संभाजी' ऐवजीं 'सयाजी' वाचावें. सयाजीस दोन मुलगे. रुस्तूम व राजरूप. संभाजी निपुत्रिक होता.

अदालतीकडे या तकरारींची दाद मिळविण्याकरितां रुस्तुम व राजरूपचे वकिलास जावें लागलें ( ले. ७४, ७६, ७८ व ८१ पहा ). याप्रमाणें या उभयतांच्या तकरारी सुरू असतां छत्रपती शिवाजीचे मरणानंतर मोठ्या सैन्यानिशीं दक्षिणेवर औरंगजेबानें स्वारी केली. सर्व महाराष्ट्रभर बादशाही सैन्याच्या व मराठ्यांच्या सैन्याच्या झटापटी व लढाया निरनिराळ्या प्रदेशांत होऊं लागल्या. संताजी घोरपड्यानें या पेठेवर स्वारी करून ती पेठ लुटून उद्ध्वस्त केली ( ले. ७१ पहा ). तदनंतर पेठेंत पूर्ववत् वसाहत करण्याकरितां बादशाही अधिकाऱ्यांकडून लोकांस कौल देण्यांत आले; तथापि महाराष्ट्रांत १६९० पासून १७०७ पावेतों शांतता अशी मुळींच कधीं नांदली नाहीं. सर्वत्र लढाया, धामधूम, लूटमार सुरू होती. अबदुल्लानें या धामधुमीचे काळांत स्वतःचा फायदा करून घेण्याची संधि चांगली साधली. पेठ उद्ध्वस्त झाल्यामुळें त्यानें त्याच्या कुटुंबांतील माणसांसुद्धां गढीचा आश्रय केला. मराठा सेनापतीस फितूर होऊन पेठेंतील मातबर लोकांस पकडून मराठा सेनापतींच्या स्वाधीन करण्यास त्यानें सुरवात केली. मराठा सेनापती या लोकांकडून जबरदस्त खंडण्या घेऊन त्यांस सोडून देत. अशा प्रकारच्या दुष्कृत्यांशिवाय पेठेंतील लोकांकडून कर वसूल करून ते सरकारी खजिन्यांत भरणा न करितां स्वतःच खाऊं लागला. याबद्दल पेठेंतील लोकांनीं व रुस्तुम व राजरूप यांच्या वकिलांनीं वरिष्ठ बादशाही अधिकाऱ्यांकडे तकरारी केल्या. त्यांची चौकशीतपास होऊन त्या खऱ्या ठरल्या. लोकांनीं केलेल्या अर्जांत अबदुल्लाच्या जुलमी वर्तनाची हकीकत खरी ठरल्यास अबदुल्ला व त्याच्या कुटुंबांतील माणसांस पेठेंतून हांकून द्यावें व पेठेंतील सावकारी व महाजनगिरी राजरूप वल्लद सयाजी याच्या नांवें नेमण्यांत यावी अशी विनंति अर्जांत केली होती. हा जो अर्ज तोच हा लेखांक १३३ आहे. या अर्जांतील हकीगतीच्या खरेपणाविषयीं वरिष्ठ बादशाही अधिकाऱ्यांची पूर्ण खात्री झाली. तथापि अबदुल्लाच्या जुलमी वर्तनास बादशाही अधिकाऱ्यांकडून आळा घालतां आला नाहीं, व अबदुल्ला हा जातीनें मुसलमान असल्या कारणानें पेठेंतून त्यास व त्याच्या कुटुंबास हांकून देण्याच्या हुकमाचा अमल बादशाही अधिकाऱ्यांकडून झाला नाहीं. या प्रकारचा अबदुल्लाचा जुलमी कारभार सुरू असतां रुस्तुम व राजरूप यांचें वास्तव्य नांदुणज येथें नव्हतें. बादशाही नोकरीवर ते अन्य ठिकाणीं राहात असावे. ले. ७६ ता. २६।४।१६९६ मध्यें नमूद केलेली हकीकत घडण्यापूर्वीं रुस्तूम व राजरूप हे नांदुणज येथें आले तेव्हां पेठेंतील लोकांकडून अबदुल्लाच्या जुलमाची हकीकत त्यांस समजतांच बादशाही अधिकाऱ्यांकडून दाद मिळत नाहीं असें पाहून राजरूप व रुस्तुम

यांनीं अबदुल्लाच्या पेठेंतील हवेल्या, गढी, मशीद वगैरे जमीनदोस्त केल्या व त्याच्या कुटुंबांतील माणसांचा शिरच्छेद करून त्यांचीं मुंडकीं आपल्या दरवाजावर टांगून दिलीं. रुस्तुमजी व राजरूप यांच्यासारख्या शूर, पराक्रमी व स्वाभिमानी मराठ्यांस अबदुल्लाचें जुलमी वर्तन सहन होणें शक्य नव्हतें. ते मोंगल बादशाहाचे जरी जहागीरदार होते व अबदुल्लासारख्या वजनदार मुसलमानाची अशा तऱ्हेनें वासलात लावल्यामुळें त्यांचेवर बादशाहाची इतराजी व संकट ओढवण्याचा प्रसंग येणार होता तरी या गोष्टीची परवा न करतां अबदुल्लाकडून होणाऱ्या जुलमाचें व अन्यायाचें त्यांनीं स्वतः परिमार्जन केलें हें त्यांचें कृत्य प्रशंसनीय नाहीं असें कसें म्हणतां येईल ? जुलूम व अन्याय कांहीं एका मर्यादेपर्यंत स्वाभिमानी पुरुष सोशील, परंतु त्या सीमेचें उल्लंघन झालें म्हणजे दुसऱ्या कोणाच्याही मदतीची अपेक्षा न करतां तो स्वाभिमानी पुरुष स्वतः युक्त व न्याय्य गोष्ट करण्यास प्रवृत्त होतो. येथपावेतों केलेल्या विवेचनाचे दृष्टीनें या लेखाचें महत्व असल्यामुळें या लेखाचें छायाचित्र आम्ही या ग्रंथांत मुद्दाम दिलें आहे.

ले. ७६ हा एप्रील सन १६९६ चा आहे. यापूर्वी १।२ वर्षांचा म्हणजे सन १६९४ अगर ९५ या सुमाराचा हा लेख असावा. ले. ७६ मधील हकीकतींत राजरूप व रुस्तूम यांचें धाडस व पराक्रम जो दिसून येतो त्या विषयींचें विवेचन पूर्वी केलेंच आहे. या लेखांत मराठ्यांच्या सेनापतीचा उल्लेख संत्या काफर असा करण्यांत आला आहे. मागें नमूद केल्याप्रमाणें मुसलमानी-पद्धतीस अनुसरून मराठा सेनाधिपती संताजी घोरपडे याचा निर्देश संत्या काफर या नांवानें केल्याचें दिसतें.

ले. १३४ सामान्य स्वरूपाचा आहे. १३५ हें कोणा एका नवाब किबला यांच्या मृत्यूविषयीं दुखवट्याचें व शांतवनाचें पत्र त्याचे नातेवाइकांस लिहिलें, त्या पत्रास पाठविलेलें हें उत्तर आहे. ले. १३६ हें पत्र राजेसो यांस लिहिलें आहे. पत्राचे शेवटीं राजे रुस्तुम व राजे राजरूप यांना सात हजारांची जहागीर मिळो अशी शुभेच्छा प्रगट केली आहे. त्यावरून हें पत्र राजे रुस्तुम व राजरूप यांचे वडील सयाजीराजे यांस त्यांच्या कोणा स्नेह्यानें लिहिल्याचें दिसतें. या पत्राचा काळ निश्चित नाहीं. ले. १३७ हें पत्र नांवाचा उल्लेख न करतां राजेसो असें नमूद करून पत्र लिहिणारानें लिहिलें आहे. पत्र लिहिणाराच्या नांवाचा उल्लेख नाहीं. पत्रांत साल नमूद नाहीं. राजेसो यांनीं एका तिऱ्हाईत इसमास पत्र पाठवून कळविलें कीं, राया नांवाचा शत्रू काफराचें सैन्य घेऊन कडेवळीत परगण्यांतील रानोगांवावर चालून आला आहे. यापुढील पत्रांतील मजकूर

फाटला आहे. पत्राचे शेवटीं राजेसाहेबांनीं शत्रूचा शोध करावा असें नमूद केलें असून राजेसो शत्रूचा पराभव करतील अशी खात्री व्यक्त करण्यांत आली आहे. हें पत्र मराठ्यांच्या स्वातंत्र्याच्या युद्धाच्या काळांतील म्हणजे इ. स. १६९० ते १७०७ च्या दरम्यानच्या काळांतील असावें. पत्रांतील राया हा शब्द धनाजी जाधवराव यास अनुलक्षून असावा असें दिसतें.

ले. १३८ हें पत्र कोणीं कोणास लिहिलें, याचा उल्लेख पत्रांत नाहीं. अहमदनगरच्या आसपासच्या मुलखांत मराठ्यांच्या फौजा लुटालूट करतात. सबब त्यांचें पारिपत्य करणें जरूर आहे असें पत्र लिहिणारानें लिहिलें आहे. या पत्रांत बजाजी नाईक व महादाजी नाईक निंबाळकर यांच्या नांवाचा उल्लेख आढळतो. या दोघांचे संबंध छत्रपती शिवाजी महाराज व राजाराम यांचेपाशीं कोणत्या प्रकारचे होते याचें अल्प दिग्दर्शन करितों. फलटणचे निंबाळकर हे विजापूरच्या आदिलशाहीचे सरदार होते. छत्रपती शिवाजी महाराजांच्या स्वातंत्र्य व स्वराज्यस्थापनेचे कामीं या घराण्यांतील पुरुषांचा व छत्रपती घराण्याचा नात्याचा संबंध असूनही कांहीं-एक उपयोग झाला नाहीं. आदिलशाही नष्ट झाल्यावर हें घराणें औरंगजेबास सामील होऊन त्यानें त्यांचेकडून सरदारी मिळविली. राजाराम छत्रपतीचे कारकीर्दींत स्वराज्य नष्ट होण्याचा प्रसंग आला असतां आपणांस सामील होण्याविषयीं त्यांस मोठ्या काकुळतीचीं राजारामानें पत्रें लिहिलेलीं उपलब्ध झालीं आहेत. या पत्रांत वरील दोघांना पत्रें पाठविल्याचा जो उल्लेख आला आहे तो मोघम स्वरूपाचा आहे. यामुळें या पत्राचा हेतु व आशय समजण्यास मार्ग नाहीं.

ले. १३९ हें पत्र राजे जयजू यास लिहिलें आहे. कोणीं लिहिलें याचा उल्लेख नाहीं व त्यांत काळाचा उल्लेख नाहीं. कादराबाद डोंगराजवळ शत्रूचें सैन्य आहे त्यास जवळच्या प्रदेशांत महाबतखान याचें सैन्य आहे त्याची मदत घेऊन चांगली तंबी द्यावी असें लिहिलें आहे. ले. १४० हें पत्र नेमाजी शिंदे यास लिहिलें आहे. पत्र लिहिणाराचें नांव पत्रांत नाहीं. नेमाजी शिंदे हा लायक उपयोगी पडणारा असा शूर सरदार आहे अशी शिफारस सयाजी राजे भोंसले यांनीं नेमाजीविषयीं केल्याचें या पत्रांत नमूद आहे. सयाजी राजे यांनीं केलेली ही शिफारस लक्षांत घेऊन जितके शिपाई असतील तितके बरोबर घेऊन नेमाजीनें सरकारांत हजर राहावें असें पत्र लिहिणारानें नेमाजीस कळविलें आहे. पत्र लिहिणारा औरंगजेब बादशाहाचा वजनदार सरदार असावा असें अनुमान करणें युक्त आहे. इ. स. १६९० सालांत औरंगजेबचे सरदार व मराठे यांची खटावजवळ लढाई झाली, तींत मराठी

कै. म. म. द. वा. पोतदार,

सैन्याचा पराभव झाला परंतु पुढें अल्पावधींत संताजी घोरपडे, धनाजी जाधव व मानसिंग मोरे इत्यादि मराठा सरदारांनीं २० हजार फौज गोळा करून औरंगजेबचा सरदार लुफ्तुल्लाखानावर हल्ला करून त्याचा पराभव केला. या मराठा सरदारांनीं मिळविलेला हा विजय पाहून नेमाजी शिंदे, माणकोजी मांढरे, नागोजी माने इत्यादि औरंगजेब बादशाहास सामील असलेले मराठे सरदार त्याची बाजू सोडून देऊन राजारामछत्रपतीस चंदीस ( जिंजीस ) जाऊन मिळाले. इ. स. १६९० त जिंजीस वेढा पडला ते वेळीं नेमाजी शिंदे राजाराम छत्रपतींचे वतीनें लढत होता. इ. स. १७०३ चे सुमारास नेमाजी शिंदे, केसोपंत पिंगळे यांनीं औरंगजेबचा सरदार सर्जाखान याचेबरोबर लढाई करून त्याचा पराभव केला व त्यास कैद केलें. त्या वेळीं त्याचेपासून ३० लाख रुपये खंडणी घेऊन त्यास सोडून दिलें. राजारामछत्रपतींचे निधनानंतर नेमाजी शिंदे शाहूछत्रपतीस मिळाला. अशा तोलाचा हा पराक्रमी सरदार राजारामास सामील होण्यापूर्वीं औरंगजेबास सामील होता व त्याचा प्रवेश औरंगजेबच्या दरबारांत सयाजीराजे यांच्या शिफारसीनें झाला असावा. वर दर्शविल्याप्रमाणें नेमाजी राजारामछत्रपतीस इ. स. १६९० चे सुमारास सामील झाला. तत्पूर्वींचें हें पत्र असावें असें अनुमान करणें युक्त आहे.

ले. १४१ या पत्रांत कडेवळीत, अष्टी, जामखेड परगण्याच्या फौजदारीवर महाबतखानजीची नेमणूक झाल्याचा उल्लेख या पत्रांत आहे. ले. १४२ हें सयाजीराजे यांस लिहिलेलें पत्र आहे. पत्र लिहिणाराचें नांव सन, महिना, तारीख यांचा उल्लेख पत्रांत नाहीं. मोंगल बादशाहाच्या मोठ्या दर्जाच्या सरदारांनीं हें पत्र सयाजीस लिहिल्याचें दिसतें. सरकाराकडून मानाचा पोशाक पाठविला आहे त्याचा स्वीकार करावा असें या पत्रांत नमूद आहे. पत्राचा कांहीं भाग फाटला आहे. शेवटच्या ओळींत हरभरे, गवत, जितकें मिळेल तितकें पाठवावें म्हणजे बादशाहाची विशेष कृपा होईल असें या पत्रांत पत्र लिहिणारानें सयाजीराजे यांस कळविलें आहे.

ले. १४३ चे शेवटीं अल्लीबेग बंदा बादशाहा अलमगीर याचा शिक्का आहे. शिक्क्यांत मुसलमानी सन १०८२ नमूद आहे, म्हणजे हा लेख इ. स. १६८२ चे सुमाराचा आहे. या लेखांत बादशाही सैन्यांत दाखल करण्यांत आलेल्या बारगिरांचीं नांवें, त्यांच्या घोड्यांचें वर्णन, त्यांच्या हाताखालील लोकांची संख्या, बारगिराची जात इत्यादि माहिती नमूद केली आहे. या यादींत एकंदर २१ इसमांच्या नांवांचा उल्लेख आहे. दोन इसमांचीं नांवें कागद फाटल्यामुळें समजण्यास मार्ग नाहीं. बाकी राहिलेल्या १९ इसमांपैकीं १४ रजपूत व ५ मुसलमान आहेत. या यादींत फक्त उमाजी बल्लद जयाजी

थांच्या नांवाखालीं शंभर माणसें रजपूत लोक असें नमूद केलेलें आहे. या लेखावरूनच औरंगजेबच्या सैन्यांत रजपूत बारगीर व शिपाई यांची भरती बऱ्याच प्रमाणावर केली जात असे असें दिसतें.

ले. १४४ या लेखाच्या सुरवातीचे भागावर राजरूप वल्द सयाजी याचे नायब असें नमूद असून त्याचे खालीं तीन शिक्के आहेत. दोन शिक्क्यांतील मजकूर समजण्यास मार्ग नाहीं. तिसऱ्या शिक्क्यांत "महंमद शफी खानाजाद औरंगजेबचा बंदा" असा मजकूर आहे. या मजकुराचे खालीं उस्मान हयात वल्द महमद अमीन अफगाण याच्या मुलाच्या चेहेरेपट्टीचें वर्णन आहे. सैन्यांत दाखल करण्यांत येणाऱ्या इसमांची नोंद बादशाही दप्तरांत या प्रकारें करण्याची त्या काळची पद्धत असल्याचें दिसतें. या मजकुराखालचा मजकूर मीरअल्ली नकीखान यास लिहिलेल्या फाटक्या पत्राचा कांहीं भाग आहे. ३ लक्ष ४ हजार दाम कडेवळीत परगण्याच्या जहागिरीच्या उत्पन्नांतून नेमले आहेत असा उल्लेख आहे. या पत्रांतील पुढील मजकूर फाटल्यामुळें हें दान कोणास देण्यांत आलें हें समजण्यास मार्ग नाहीं. तिसरा लेख पहिल्या लेखासारखाच आहे व शिक्के पहिल्या लेखाप्रमाणेंच आहेत. शिवाजीचा मुलगा शंकराजी याचें वर्णन या लेखांत आहे. यांत १२ बारगिरांच्या नांवाची नोंद आहे. यांपैकीं एक मुसलमान व बाकी मराठे आहेत. बारगिरांच्या नांवाखालीं प्रत्येकाजवळ दोनशें घोडे असल्याचा उल्लेख आहे. यावरून मराठे बारगीर आपल्या घोड्यांसुद्धां औरंगजेबाच्या सैन्यांत दाखल होत असत असें दिसतें. पत्रावर शिक्का असून त्यांत 'मोहोर नायबी महमद बाबर अल् हुसेनी बंदा औरंगजेब' असा मजकूर नमूद आहे. दुसऱ्या एका शिक्क्यांत नकल बरोबर आहे असा मजकूर आहे. यावरून बादशाही दप्तरांतील अस्सल नोंदीची हा लेख शिक्क्यानिशींची नकल आहे असें दिसतें. या लेखांतील या पुढील नोंदी याच स्वरूपाच्या आहेत. मोंगल बादशहांच्या सैन्यभरतीसंबंधीं ठेवण्यांत येण्याऱ्या सरकारी दप्तराचा हा लेखांक एक नमुना आहे. राजवट कोणाही सत्ताधाऱ्याची असो, या लेखावरून दिसून येणारी पद्धत थोड्याफार फरकानें अस्तित्वांत येणें अपरिहार्य आहे. ले. १४५ यांत बारगिरांच्या नांवाची व त्यांच्या जवळील घोड्यांची संख्या इत्यादि मजकुराची ले. १४४ प्रमाणेंच नोंद आहे.



# राजवाडे मंडळाचें निवेदन

( लेखक—श्री. भास्कर वामन भट, चिटणीस, रा. सं. मंडळ धुळें )

मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांचे या खंडांतील फारशी ऐतिहासिक लेख कोणत्या प्रकारच्या अनास्थेंतून शाबूत राहून जगापुढें प्रगट होत आहेत या विषयींचें श्रीयुत भिकाजीराजे भोंसले यांचें संपादकीय निवेदन खेदजनक आहे, तथापि या अनास्थेंतून शाबूत राहून हे लेख प्रसिद्ध होण्याचा योग आला ही गोष्ट समाधानाची आहे. सर यदुनाथ सरकार, रावबहादूर गोविंद सखाराम सरदेसाई, धारचे इतिहाससंशोधक व हिस्टरी ऑफिसर कै. काशीनाथपंत लेले ह्यांच्यासारख्या तज्ञ इतिहाससंशोधकांचे नजरेखालून हे लेख जाऊन व त्यांच्या महत्त्वाची त्यांस जाणीव होऊनही भिकाजीराजे यांचेकडून ते लेख मिळवून प्रसिद्ध केले न गेल्यामुळें राजवाडेमंडळाकडून हे लेख प्रसिद्ध करण्याचा हा योग जुळून आला आहे. ग्वाल्हेरचे सरदार व शिंदेशाहीच्या इतिहासाचीं साधनें प्रसिद्ध करणारे श्रीमंत आनंदराव भाऊसाहेब फाळके यांनीं, हे लेख छापून प्रसिद्ध करण्याचें पतकरिलें होतें, व हे सर्व लेख भिकाजीराजे यांनीं त्यांचे स्वाधीनही केले होते, परंतु त्यांचे हातून हें काम झालें नाहीं. त्यानंतर इ. स. १९३९ च्या मे महिन्यांत हे सर्व लेख राजवाडेमंडळाचे हातांत आले.

धुळ्याचे आमचे एक स्नेही श्री. मोरेश्वर नरहर नकाणकर धार संस्थानांत नोकर होते. त्यांचेकडून छत्रपती शिवाजीमहाराजांच्या घराण्याच्या जुन्या लेखांचा संग्रह धार येथील एका गृहस्थाकडे आहे तरी तो पाहाण्या-करितां धारेस यावें असें पत्र मला आलें. हें पत्र आमचे हातांत आल्यावर नकाणकरांचे म्हणण्यावर आमचा विश्वास बसेना. कारण मध्य हिंदुस्थानां-तील धारसारख्या शहरीं शिवछत्रपती घराण्याचे लेख उपलब्ध होण्याचा संभव फार अल्प असें आम्हांस वाटलें. यानंतर वर्ष सहा महिने नकाणकर यांचेशीं आमचा पत्रव्यवहार होऊन हा संग्रह ज्यांच्या ताब्यांत होता ते श्रीमंत भिकाजीराजे भोंसले सन १९३७ च्या एप्रील महिन्यांत धारेहून पंधरा अस्सल फारशी लेख घेऊन धुळ्यास आमचेकडे आले. तेव्हां त्यांच्या संग्रहीं असलेले सर्व फारशी लेख व मराठी ऐतिहासिक लेख प्रसिद्ध करण्या-करितां राजवाडेमंडळास देण्याबाबत त्यांचे व आमचे दरम्यान निश्चित बोलणें होऊन हें कार्य मंडळानें करावयाचें ठरविलें.

शिवकालीन ऐतिहासिक लेखांचा कसून शोध करून ते मिळविले पाहिजेत अशी राजवाड्यांची उत्कट इच्छा होती; व त्यांनीं शिवकालीन घराण्यांचीं दप्तरें

तपासून त्यांतील महत्वाचे ऐतिहासिक लेख मिळवून ते मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड १५,१६,१७,१८,२०,२१ व २२ यांत छापून प्रसिद्ध केले. पुण्याच्या भा. इ. सं. मंडळास मुधोळ संस्थानाधिपति कै. मालोजी राजे घोरपडे यांनीं शिवकालीन ऐतिहासिक कागदपत्रांचा शोध करून ते प्रसिद्ध करण्याकरितां रकम रुपये पांच हजार (५०००) ची देणगी दिली. भा. इ. सं. मंडळानें देणगीचा विनियोग शिवकालीन लेख शोध करून प्रसिद्ध करण्याकरितां केला. त्या मंडळाचे संशोधक रा. गणेश हरी खरे यांनीं कर्नाटक, तंजावर, बंगलूर, मद्रास इत्यादि प्रदेशांत प्रवास करून बरेच शिवकालीन लेख मिळविले व ते भा. इ. सं. मंडळानें शिवचरित्र साधनें खंड एक ते सहामध्यें प्रसिद्ध केले. आज तागायत मराठ्यांच्या इतिहासाचीं शिवकालीन साधनें बरींच प्रसिद्ध झालीं आहेत. या सर्व साधनांची बरवर पाहाणी करणारास असें दिसून येईल कीं, इ. स. १६३६ म्हणजे स्वराज्याची मुहूर्तमेढ छत्रपती शिवाजीमहाराजांनीं रोंवण्यापूर्वीं नऊ वर्षांपासून तों इ. स. १७०७ सालीं अवरंगजेबाचे निधनाचे कालापावेतों आंबोरकर भोंसल्यांच्या फारशी लेखांसारखे लेख एकाही शिवकालीन घराण्याचे उपलब्ध झाल्याचें आढळत नाहीं. आतां दर्शविलेल्या विशेषाशिवाय दुसरा एक विशेष या लेखांसंबंधीं सहज कोणाच्या लक्षांत येण्यासारखा आहे. तो असा कीं, छत्रपती शिवाजी महाराजांच्या चुलत्याच्या वंशजाच्या घराण्यासारख्या निकट अशा एकाही घराण्याचे शिवकालीन ऐतिहासिक लेख आजतागायत प्रसिद्ध झाले नाहींत, हा होय. राजवाड्यांच्या हयातींत हे लेख त्यांना प्राप्त झाले असते तर त्यांना मोठें समाधान वाटून आनंद झाला असता. परंतु या बाबतींतील त्यांच्या मृत्युसमयींची अतृप्त वासना हे लेख वर दर्शविल्याप्रमाणें तज्ञ इतिहाससंशोधकांचे नजरेखालून जाऊनही ते मिळवून प्रसिद्ध करण्याची इच्छा त्यांना न झाल्यामुळें व राजवाड्यांची अतृप्त इच्छा त्यांच्या पश्चात् तृप्त व्हावयाची असल्यामुळें हे लेख राजवाडेमंडळास प्राप्त व्हावयाचा योग आला. श्रीमंत भिकाजीराजे यांनीं मंडळावर पूर्ण विश्वास ठेवून हे लेख प्रसिद्धीकरितां मंडळास दिले याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोंत. मंडळानें भिकाजीराजे यांस दिलेल्या वचनास अनुसरून हे लेख ग्रंथरूपानें प्रसिद्ध केल्यामुळें त्यांनाही समाधान व आनंद वाटेल अशी आमची खात्री आहे.

या ग्रंथांतील मूळ फारशी कागदांचें वाचन बरोबर करून त्यांचा मराठी अनुवाद करणें ही गोष्ट प्रस्तुत अत्यंत कठीण आहे. चाळीसगांव येथील इंग्रेजी शाळेंतील शिक्षक श्रीयुत गोपाळ राजेश्वर पाडळकर हे निजामहैदराबाद संस्थानांतील रहिवाशी असून फारशी भाषा त्यांना चांगली अवगत आहे.

उस्मानिया युनिव्हर्सिटीची दुय्यम भाषा फारशी घेऊन त्यांची प्रवेश परीक्षा पास झाली आहे. त्यांचे वडील विश्वविद्यालयाची पदवी धारण करणारे नव्हते, तथापि जुन्या फारशी लेखांचें वाचन करण्यांत त्यांनीं प्राविण्य मिळविलें होतें. त्यांच्या सहवासांत पाडळकरांना जुनें फारशी लेख वाचण्याचें ज्ञान प्राप्त झालें. राजवाडेमंडळाचा व पाडळकरांचा स्नेहसंबंध इ. स. १९३२ सालापासून जुळून आल्यामुळें भोंसले घराण्याच्या फारशी लेखांचा मराठी अनुवाद करण्याचें काम त्यांचेकडे सोंपविण्यांत आलें. हें कार्य करण्याची त्यांची लायकी कितपत आहे याची खात्री करून घेण्याकरितां मुंबई विश्वविद्यालयाची फारशी दुसरी भाषा घेऊन बी. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झालेल्या पदवीधरांपैकीं एकास यांतला एक फारशी लेख वाचण्याकरितां दिला. दोनतीन ओळींपलीकडे हा लेख त्या पदवीधरास वाचतां आला नाहीं. पाडळकरांनीं सबंध लेख वाचून त्याची फारशी नक्कल व त्याचा मराठी तर्जुमा अल्प वेळांत तयार करून दिला. आम्ही एवढ्यावरच विसंबून न बसतां हिंदुस्थान सरकारचे रेकार्ड कीपर सर सुरेंद्रनाथ सेन यांच्या हाताखालीं जुने फारशी लेख वाचणाऱ्या तज्ज्ञाकडे या लेखांपैकीं चार अस्सल लेख व त्यांच्या पाडळकरांनीं केलेल्या नकला अस्सल लेखांशीं ताडून पाहून त्यांत आढळणाऱ्या वाचनाच्या चुका लेखाचे समासामध्यें नमूद करण्याविषयीं विनंति करून त्यांचेकडे पाठविले. आमची विनंति मान्य करून डॉ. सेन यांनीं त्यांच्या हाताखालील फारशी तज्ञाकडून पाडळकरांच्या लेखाची तपासणी करून ते लेख आमचेकडे परत पाठविले. त्यांत त्यांनीं पाडळकरांच्या नकलांत वाचनाचे कांहीं थोडे भेद सुचविलेले आढळले व त्यावरून अस्सल फारशी लेखांचें पाडळकरांचें वाचन बव्हंशीं बरोबर असल्याविषयीं आमची खात्री झाली. शिवकालीन ऐतिहासिक मोडी लेखांचें बरोबर वाचन करणें जितकें दुर्घट आहे तितकेंच शिवकालीन फारशी कागदांचें वाचन करणें दुर्घट आहे. असल्या प्रकारच्या मोडी अगर फारशी लेखांचें वाचन करतांना कांहीं अक्षरांचें वाचन करण्याबाबत हे लेख वाचणाऱ्या दोन व्यक्तींच्या वाचनांत कांहीं मतभेद होणें स्वाभाविक आहे. ही गोष्ट लक्ष्यांत घेतां या ग्रंथांत छापण्यांत आलेले लेख स्थूलमानानें बरोबर आहेत असें मानण्यास हरकत नाहीं. या लेखांचा मराठी अनुवाद शब्दशः फारशी शब्दांचें मराठी भाषांतर करून पाडळकरांनीं केलेला नाहीं. फारशी शब्दांचें शब्दशः मराठी भाषांतर बोजड व विचित्र भासतें. यास्तव फारशी वाक्यांचा मराठी भाषेंतील अनुवाद अर्थाची हानि न होईल याची खबरदारी घेऊन पाडळकरांनीं केला आहे.

या खंडांतील फारशी लेखांच्या प्रकाशनाची जी जबाबदारी मंडळानें आपल्या शिरावर घेतली ती बऱ्या प्रकारें पार पाडण्याचे कामीं श्री. पाडळकर यांनीं मंडळास बहुमोल मदत केली त्याबद्दल मंडळ त्यांचें आभारी आहे.

या खंडांतील फारशी लेख व त्यांचा मराठी अनुवाद प्रसिद्ध करण्याचें एक प्रकारचें धाडस मंडळानें केलें आहे. या लेखांच्या प्रसिद्धीनंतर मंडळानें केलेले प्रकाशनाच्या कार्यावर प्रतिकूल टीका होण्याचा संभव आहे. अशा प्रकारची कोणीं टीका केल्यास मंडळ तिचें आनंदानें केव्हांही स्वागत करील.

मराठ्यांच्या इतिहासाच्या संशोधनाच्या दृष्टीनें या लेखांचे मूल्य, या लेखांवरून उपस्थित होणारे कांहीं महत्त्वाचे ऐतिहासिक प्रश्न, छत्रपती शिवाजीमहाराजांच्या स्वराज्यस्थापनेच्या काळांतील व त्यांच्या निधनानंतर इ. स. १७०७ सालीं अवरंगजेबाच्या मृत्यूच्या काळापावेतोंची महाराष्ट्राची परिस्थिति इत्यादि मुद्द्यांची चर्चा मंडळाच्या निवेदनांत करणें प्राप्त आहे.

शिवकालीन इतिहाससाधनें आजतागाईत जीं प्रसिद्ध झालीं आहेत, त्यांत या लेखांचे मूल्य फार मोठें आहे, याविषयीं दुमत होण्याचा संभव नाहीं, असें आम्हांस वाटतें, करितां या मुद्द्याची अधिक चर्चा करण्याचें प्रयोजन नाहीं.

मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांचा अभ्यास करणाऱ्या संशोधकांच्या व या इतिहासाशीं परिचय असणाऱ्या सामान्य लोकांच्या मनांत या लेखांचे वाचनाचे अंतीं एक प्रश्न प्रामुख्यानें उपस्थित झाल्याखेरीज राहाणार नाहीं. तो प्रश्न म्हणजे इ. स. १६४५ पासून १६८० पावेतोंच्या काळांत छत्रपती शिवाजीमहाराज, दिल्लीच्या मोंगल व विजापूरच्या आदिलशाही बादशहांच्या राजकीय वर्चस्वांतून व गुलामगिरींतून महाराष्ट्रीयांस मुक्त करून स्वातंत्र्य व स्वराज्यावर अधिष्ठित करण्याचा भगीरथ प्रयत्न करीत असतां त्यांचे चुलते विठोजी राजे भोंसले व त्यांचे आठ मुलगे त्यांस सामील व साह्यकारी न होतां मोंगल बादशाहाशीं राजनिष्ठ कसे राहिले ? प्रस्तुतच्या सुशिक्षित महाराष्ट्रियांची अशी कल्पना आहे कीं, शिवकालीन महाराष्ट्रीय लोकसमाजाच्या वरिष्ठ, मध्यम व कनिष्ठ थरांतील बहुसंख्य लोक स्वातंत्र्य व स्वराज्य मिळविण्याच्या तीव्र उत्कंठेनें प्रेरित झाले होते. असे स्थितींत विठोजीराजे भोंसले यांचे मुलगे शिवाजीचे कार्यांपासून अलिप्त राहाणें हें विस्मयकारक आहे. उपलब्ध झालेल्या तत्कालीन इतिहाससाधनांची तपासणी केली असतां असें आढळतें कीं, शिवछत्रपतिकालीन महाराष्ट्रीय समाजांतील बहुसंख्य लोक

त्यांतल्या त्यांत महाराष्ट्रीय समाजाच्या वरिष्ठ थरांतील देशमूख, देशपांडे, वतनदार, जहागीरदार, इनामदार इत्यादि या भावनेपासून अलिप्त होते. कोणत्या कारणांमुळें या लोकांची ही अलिप्तता होती, हें यापुढें दिलेल्या विवेचनावरून स्पष्ट होणार असून यांत विस्मय वाटण्याचें कांहींच कारण नाहीं असें दिसून येईल. या पुढील विवेचनांत मालोजीराजे भोंसले यांचे पुत्र शहाजीराजे व त्यांचे नातू छत्रपती शिवाजी महाराज, त्याचप्रमाणें विठोजीराजे भोंसले व त्यांचे आठ पुत्र व नातू यांच्या राजकीय चारित्र्यावर व या घराण्याचें वास्तव्य ज्या प्रदेशांत होतें त्या प्रदेशावर त्या काळीं अस्तित्वांत आलेल्या राजकीय घडामोडींचे परिणाम कोणत्या स्वरूपाचे झाले याचें उपलब्ध झालेल्या तत्कालीन साधनांचे आधारें जें दिग्दर्शन केलें आहे त्यावरून एकाच काळांतील एका घराण्यांतील पुरुष स्वातंत्र्य व स्वराज्याचे संस्थापक व दुसऱ्या घराण्यांतील पुरुष हिंदुधर्माची व संस्कृतीची पायमल्ली करणाऱ्या मोंगल व आदिलशाही मुसलमान बादशाहांशीं राजनिष्ठ कोणत्या कारणांमुळें राहिले याची याथातथ्य कल्पना इतिहासज्ञांस त्याचप्रमाणें सामान्य वाचकांस येईल.

वरील प्रश्नाच्या चर्चेच्या दृष्टीनें प्रथम मालोजी राजाच्या घराण्यांतील शहाजीराजे व शिवाजीराजे यांच्या हालचालींचें व राजकीय चारित्र्याच्या विकासाचें, त्याचप्रमाणें विठोजीराजे यांच्या घराण्यांतील त्यांचे आठ पुत्र व त्यांचे वंशज यांच्या हालचालींचें व राजकीय चारित्र्याच्या विकासाचें दिग्दर्शन करणें युक्त आहे. या दिग्दर्शनांतील दोन्ही घराण्यांच्या कथनाची तुलना केली असतां विठोजीराजे भोंसले व त्यांचे वंशज शिवाजीपासून अलिप्त कां राहिले व त्यांनीं त्यास साहाय्य कां केलें नाहीं याचा उलगडा सुलभपणें होणार आहे.

छत्रपती शिवाजीमहाराज उदयास येण्यापूर्वी हिंदू लोकांस पूज्य असलेले देव, दैवतें, तीर्थक्षेत्रें, श्रुतिस्मृतिप्रणीत आचारधर्मांचा लोप व महाराष्ट्रांतील कित्येक लोकांचा महंमदी धर्माचा स्वीकार इत्यादि गोष्टींकडे महाराष्ट्रीय समाजाच्या विचारवंत पुढाऱ्यांचें लक्ष तीव्रपणें वेधलें गेलें होतें. मुसलमानांची राजकीय सत्ता व महंमदी धर्म यांचें महाराष्ट्रांतून उच्चाटन न केल्यास श्रुतिस्मृतिप्रणीत धर्म अस्तास जाऊन सर्व महाराष्ट्र यवनमय झाल्याखेरीज राहाणार नाहीं असें या पुढाऱ्यांस स्पष्टपणें दिसूं लागलें. महाराष्ट्रांतील ब्राह्मण व क्षत्रिय ज्ञातींपैकीं ज्या थोडीदशीं विचारवंत पुढाऱ्यांच्या लक्षांत ही गोष्ट आली, त्यांत शहाजीराजे भोंसले हे एक प्रमुख होते. राधामाधवविलासचंपूकारानें, उत्तरेस शाहाजहान बादशाहाचा जसा

श्रेष्ठ दर्जा व दरारा होता तसा दर्जा व दरारा शहाजीराजे यांचा दक्षिण भारतांत होता, असें वर्णन केलें आहे. शहाजीराजे यांनीं आदिलशाही दरबाराचा आश्रय केल्यावर कर्नाटक प्रांतावर स्वाऱ्या करून त्या प्रांतांतील राजांच्या ताब्यांतील मुलूख काबीज करून तो आदिलशाही राज्यांत सामील केला. या कामगिरीमुळें बादशाही कृपा संपादन करून त्यांनीं जिंकलेल्या मुलुखापैकीं कांहीं मुलूख बादशाहाकडून इ. स. १६३८ चे सुमारास जाहागीर म्हणून मिळविला व त्यांनीं बंगळूर शहरीं वास्तव्य केलें. या शहरीं एखाद्या मांडलिक राजाप्रमाणें त्यांनीं आपला दरबार थाटला. त्यांच्या दरबारांत कित्येक राजकारणपटु ब्राह्मण मुत्सद्दी, पराक्रमी योद्धे, विद्वान् पंडित व गायनवादनपटु कलावंत लोक होते. शहाजी हिंदु धर्माचा पूर्ण अभिमानी होता. विजापूरच्या आदिलशाही दरबारांत तो असतांना त्यानें हिंदु देवस्थानांस इनामें दिल्याचे दाखले उपलब्ध झाले आहेत. हिंदुधर्माची आदिलशाही मुसलमानी अमलाखालीं होत असलेली पायमल्ली शहाजी साक्षात् आपल्या डोळयानें पाहात होता, परंतु याबद्दल एक ब्रही न काढतां ती त्याला निमूटपणें सहन करावी लागत असे. या कारणा-करितां स्वातंत्र्य व स्वराज्य स्थापन करण्याची कल्पना त्याचे मनांत उदित झाली असावी. निव्वळ व्यावहारिकदृष्ट्या विचार केला असतां शहाजीस तत्कालीन निरनिराळ्या मुसलमानी राजघराण्यांच्या आश्रयाचा फार कडू अनुभव आला होता. ज्या ज्या निरनिराळ्या मुसलमानी राजघराण्यांच्या दरबारांचा शहाजीनें आश्रय केला त्या त्या दरबारांत त्याची गत विचित्र झाली. त्याचें उत्कृष्ट कथन खालील परिच्छेदांत केलेलें आढळेल.

"शक १५४२ ( इ. स. १६२० ) ते १५४६ पर्यंत चार वर्षे तो निजामशाहींत होता पण तेथें भाऊबंदकीमुळें व मलिकंबराशीं वितुष्ट आल्या-मुळें त्या शाहीस रामराम ठोकून तो आदिलशाहींत गेला; तेथें दोनतीन वर्षे होतात तों त्याचा महमदशहानें अपमान केला; व ही बादशहाच्या भावी गैरमर्जीची धोक्याची प्रथमसूचना मिळतांच तेथून तो शक १५५० मध्यें परत निजामशाहींत गेला. तेथें तर भरदरबारांत प्रत्यक्ष जाधवरावासारखा वृद्ध, पराक्रमी व अनुभवी सरदार ठार झाल्याचें दिसतांच जो तो हवालदील झालेला पाहून शहाजीहि उठून मोंगलांकडे गेला; आणि त्या मोंगलांनींहि जेव्हां फत्तेखानाची कड घेऊन शहाजीस धुडकावून लाविलें तेव्हांमात्र शहाजीला तेथून दुसऱ्या शाहीकडे जाण्यास वावच राहिला नाहीं. चोहोंकडून तो कोंडींत सांपडल्यासारखा झाला, आणि दुकटा राजकारणाचा डाव खेळत बसणें त्याला यापुढें अशक्य झालें. विजापूरकरांनीं नुकतेंच एक वर्षापूर्वीच

त्याच्याशीं युद्ध पुकारून त्याचा पुण्यातील वाडा जाळून पोळून आपला संताप व्यक्त केला होता; फत्तेखानतर शत्रु म्हणूनच समोर उभा होता, आणि मोंगलांनीं चार दिवस शहाजीला मनसब दिल्याचा आव आणून त्याचा चेळखंडोबा चालविल्याचें तो प्रत्यक्षच अनुभवीत होता. यामुळें दुबळ राजकारणाची अनुभविलेली आणि जिळी पद्धति निकामी ठरून जिवंत रहावयाचें असेल व तेंही थोडाबहुत शिपाईबाणा कायम ठेवून रहावयाचें असेल, तर स्वावलंबनाच्या जोरावर राजकारणाची उभारणी करण्यावांचून गत्यंतर नाहीं; या परिस्थितीची जाणीव शहाजीला थोडीथोडी होऊं लागली असावी. त्यानें त्या वेळच्या शिष्टाचाराला अनुसरून तिन्ही शाह्यांची क्रमानें इमानेंइतबारें सेवा करून पाहिली. त्या सर्वही ठिकाणीं आपण केलेल्या एकनिष्ठ कामगिरीचें चीज न होतां उलट प्रत्येक ठिकाणीं या दुबळ राजकारणाचें भूत थयथयाट करीत होतें. त्यामुळें कोणत्या वेळीं कोणाचा संक्षेप उडेल याची शाश्वती नव्हती. स्वतः शहाजीच्या सरळपणाचा वेळीं अवेळीं इतरांनीं फायदा घेतल्याचें स्पष्ट दिसतें. परंतु खुद्द शहाजीनें वक्र राजकारण केल्याचा इतिहासांत पुरावा मिळत नाहीं. तेव्हां शहाजीसारख्या पराक्रमी व एकमार्गी सरदाराच्या मनांत त्या वेळच्या सर्व सत्ताधीशांच्या बेइमानीपणाबद्दल तिटकारा उत्पन्न होऊन स्वतःच्या भवितव्यतेबद्दल विचार करतां करतां, वर सांगितल्याप्रमाणें इतर सर्वच मार्ग खुंटल्यामुळें, दिसणाऱ्या अंधारांतून चांचपडत असतां, एकदम स्वतंत्र प्रयत्नानें निजामशाही उभारण्याची कल्पना सुचावी आणि परिस्थितीनें आणि त्याच्या नेकजात दानतीमुळें त्यामध्यें त्याला बरेंचसें यश यावें, ही गोष्ट त्या वेळच्या इतिहासांत जितकी अभूतपूर्व तितकीच आणि त्याच कारणामुळें नवयुगप्रवर्तक झाली यांत शंका नाहीं."

(शिवचरित्र निबंधावलि अनुक्रम २ पृ. ५९)

मुसलमानी राजकीय सत्ताधाऱ्यांकडून शहाजीची वरील उताऱ्यांत दर्शविल्याप्रमाणें दुर्दशा झाल्यामुळें या मुसलमानी राजसत्तेचें उच्चाटन करून स्वतंत्र हिंदू राज्याची स्थापना करण्याची कल्पना शहाजीच्या मनांत आली असावी, हें जें वरील उताऱ्यांत दर्शविलें आहे तें सयुक्तिक आहे. निजामशाही अस्तंगत होत असतां शहाजीनें या घराण्यापैकीं मूर्तिजा निजामशहा यास आपले बगलेंत घेऊन नामधारी बादशाहाचा सर्व सत्ताधारी होण्याचा शके १५५४ अगर १५५५ (इ. स. १६३२-३३) चे सुमारास प्रयत्न केला, परंतु तो यशस्वी झाला नाहीं. शहाजीनें केलेल्या या प्रयत्नाचें कथन थोडक्यांत खालील उताऱ्यांत केलेलें आढळतें.

" परंतु शहाजीसारख्या राजकारणांत जबाबदारी पतकरणाऱ्या मराठ्याला या वेळीं चैन पडणें शक्य नव्हतें. मोंगलांनीं आपणांस झिडकारून दिलें, आदिलशाहींत दुमत असल्यामुळें बखेडा माजला आणि दौलताबाद मोंगलांनीं हस्तगत करून निजामशाही बुडविली. अशा वेळीं चालू राज्य-यंत्रांत आपला मान राहाणार नाहीं हें ओळखून शहाजीनें नवीन निजामशाही उभारून शहाजहानाच्या चढाईस उत्तर देण्याचें निश्चित केलें, तथापि हें राज्यंयंत्र टिकविणें फार कठीण काम होतें. दिल्ली व विजापूर येथील बादशाहांमधील तेढ कायम राहील तर आपली नवी शाही टिकवितां येईल, पण त्यांची जूट झाल्यास त्यांच्या विरोधापुढें आपला टिकाव लागणार नाहीं हें शहाजीच्या लक्ष्यांत येण्याजोगें होतें. अर्थात् धर्मभावनेनें प्रेरित होऊन आपण ही नवी शाही उभारित आहों अशी शंका येऊं न देण्याची खबरदारी घेणें त्याला भाग होतें; कारण हिंदूंची संघटना तयार नव्हती व जर ती नवीन तयार केली तर ती बाल्यावस्थेमुळें विरुद्ध पक्षाच्या धडकीपुढें टिकणें शक्य नव्हतें. राजकीय बाबतींततरी बळी तो कान पिळी हा न्याय चालू होता; यामुळें कोणच्या शाहीनें जगावें आणि कोणत्या शाहीनें मरावें या प्रश्नाचा निर्णय युद्धाच्या कसोटीनें लागत असे. तथापि या न्यायालादेखील बलवानांतील परस्परांसंबंधींचा मत्सरभाव अपवाद उत्पन्न करतो. या मत्सरभावामुळें कमजोर राजांची दोस्ती अस्तित्वांत येते व ती शिरजोर राजांशीं टक्कर देण्यास त्यांना समर्थ करते. मलिकंबरानेंतरी निजामशाही उभारली ती दिल्लीपती व दक्षिणेंतील शाह्या यांच्यामधील मत्सराच्या आधारावरच उभारली; आणि पुढें दिल्लीकरांची शक्ति अंतर्गत भानगडींत बहुतेक खर्ची पडल्यामुळें मलिकाला नवीन शाही पंचवीस वर्षें टिकवितां आली. त्याचप्रमाणें शहाजीला चोंहोंकडून हुसकून लावण्यांत आल्या वेळीं आदिलशाही मुत्सद्द्यांनीं त्याला दुजोरा दिल्यामुळें नवी निजामशाही उभारण्याची कल्पना शक्य कोटींतली वाटली.

( शिवचरित्र निबंधावली-अनुक्रम २ पृ. ७७ )

या कल्पनेस शहाजीनें मूर्तरूप देण्याचा प्रयत्न केला, परंतु त्याची फसगत होऊन विजापूरच्या आदिलशाही दरबाराचा त्यानें कायमचा आश्रय केला. या दरबारांत असतां शहाजीचा दर्जा व दरारा कोणत्या प्रकारचा होता हें मागें नमूद केलें आहे. अशा स्थितींत निजामशाहीच्या पडत्या काळांत स्वराज्याची स्थापना करण्याचा त्याचा जो बेत फसला तो बदललेल्या राजकीय परिस्थितींत सिद्धीस नेण्याचा त्यानें फिरून घाट रचला. निजाम-शाही बुडाल्यामुळें शहाजीची पुणें परगण्याच्या जहागिरीचा मुलूख निर्भय

होता. स्वराज्यस्थापनेस हा मुलूख त्याच्या दरबारांतील मुत्सद्यांच्या सल्लामसलतींत पसंत करण्यांत आला व या प्रदेशांत या मुत्सद्यांच्या साह्यानें शिवाजीकरवीं स्वराज्यस्थापना करण्याचें शहाजीराजे यांनीं, शिवाजीकरवीं केल्या जाणाऱ्या या उद्योगापासून पूर्ण अलिप्त असल्याचा देखावा दाखवून त्यास अप्रत्यक्ष मदत करावयाची असा बेत केला. या मार्गानें जाण्याचें शहाजीनें ठरविलें, व हें धोरण त्यानें आपल्या हयातीअखेर कायम ठेविलें. शहाजीची ही योजना इ. स. १६४० चे सुमारास निश्चित ठरली. त्यानंतर इ. स. १६४१ चे सुमारास पुण्याच्या शहाजीच्या जहागिरीचा कारभारी दादाजी कोंडदेव शिवाजी व जिजाबाई यांना घेऊन बंगरुळास शहाजीकडे आला. बंगळूर येथें शहाजीच्या सहवासांत शिवाजीच्या अल्प-वयांत त्याच्या ठिकाणची स्वधर्मनिष्ठा व त्याची लोकोत्तर बुद्धिमत्ता आणि कर्तबगारी शहाजीराजे यांच्या प्रत्ययास आली व त्यांच्या मुत्सद्यांच्या सल्ल्यानें ठरलेली योजना पार पाडण्याचें त्यांनीं ठरविलें. आम्हीं केलेलें हें कथन काल्पनिक नसून वस्तुस्थिति निदर्शक आहे हें कृष्णाजी अनंत सभासद-कृत शिवछत्रपतींचे चरित्रांतील ( जें चरित्र नामांकित इतिहाससंशोधकांनीं विश्वसनीय ठरविलें आहे ) खालील उल्लेखांवरून दिसून येतें.

" शहाजीराजे यांसि दौलतेमध्यें पुणें परगणा होता. तेथें दादाजी कोंडदेव शहाणा चौकस ठेविला होता.

तो बेंगळुरास माहाराजांचे भेटीस गेला. त्याबरोबर राजेश्री शिवाजी-राजे व जिजाबाई आऊ ऐशीं गेलीं तेसमयीं राजियास वर्षें बारा होतीं. बरोबर शामराव नीळकंठ म्हणून पेशवे करुन दिले. व बाळकृष्णपंत, नारोपंत दीक्षितांचे चुलतभाऊ मजुमदार दिले व सोनोपंत डबीर व रघुनाथ बल्लाळ सबनीस, ऐसे देऊन दादाजीपंतास व राजे यांसि पुण्यास रवाना केलें. " ( शिवछत्रपतींचें चरित्र पृ. ७ ).

बंगळूर येथें वर दर्शविल्याप्रमाणें स्वराज्यस्थापनेचें जें कार्य करावयाचें ज्या मुत्सद्यांच्या विचारविनिमयानें निश्चित ठरलें व ज्या कल्पनेस मूर्तरूप देण्याच्या हेतूनें शहाजीराजांनीं या मुत्सद्यांस शिवाजीबरोबर पुण्यास पाठविलें, त्या मुत्सद्यांची पुण्यास रवानगी करण्यापूर्वीं पुणें परगण्याच्या जहागिरीचा कारभार एकटा दादाजी कोंडदेव पाहातच होता; व या मुत्सद्यांची पुण्यास रवानगी करण्याचें कांहीं कारणही नव्हतें. ही गोष्ट लक्ष्यांत घेतां पुणें परगण्यांत शिवाजीकरवीं स्थापन होणाऱ्या स्वराज्याचे कामीं या मुत्सद्यांची शहाजी राजे यांनीं पुण्यास रवानगी केली असली पाहिजे, हेंच अनुमान करणें युक्त आहे. ही घटना शके १५६३ ( इ. स. १६४१ )

त शिवाजी बारा वर्षांचा असतांना अस्तित्वांत आली (शिवचरित्र निबंधावली पान ११३).

शिवाजीची रवानगी वरीलप्रमाणें पुणें परगण्याकडे करण्यापूर्वी पुणें परगण्यांतील कार्यांत मावळचा पोट मोकासा शहाजी राजांनीं शिवाजीचे नांवावर दाखल केला होता. ही योजना शिवाजीची मत्ता शहाजीपासून स्वतंत्र असून तीवर त्याची हुकमत चालते असा देखावा विजापूर दरबारांत दाखविण्यास्तव शहाजी राजांनीं व त्यांचेवरील मुत्सद्दी यांनीं वर दर्शविलेल्या स्वराज्यस्थापनेच्या हेतूस पोषक व्हावी यास्तव केली असावी असें अनुमान करणें युक्त होईल. शके १५६७ (इ. स. १६४५) त "प्रतिपच्चंद्ररेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता" इत्यादि मजकुराची शिवाजीची मुद्रा त्याच्या कचेरींत, जहागिरींत राहाणाऱ्या प्रजेच्या व्यवहारासंबंधीं तयार होणाऱ्या सर्व लेखांवर करण्यास सुरवात झाली. ही मुद्रा कोणीं सामान्य माणसानें तयार करणें संभवनीय नाहीं. शिवाजीबरोबर देण्यांत आलेल्या वरील मुत्सद्द्यांपैकीं एकाद्याचे अगर सर्वांचे विचारविनिमयानें ही मुद्रा रचली गेली असली पाहिजे, असेंच अनुमान करणें युक्त आहे. शिवाजीस प्राप्त झालेल्या भावी वैभवाची व त्याचेकरवीं होणाऱ्या स्वराज्यस्थापनेची सूचक अशी ही मुद्रा आहे. येथपावेतों केलेलें विवेचन काल्पनिक आहे असा आक्षेप निराधार ठरविण्यास एक उत्कृष्ट ऐतिहासिक साधन उपलब्ध झालें आहे. हें साधन म्हटलें म्हणजे जेधे शकावलींतील पुढें दिलेला उतारा हें आहे. (या शकावलींतील माहिती ऐतिहासिक दृष्ट्या विश्वसनीय असल्याचें तज्ज्ञ इतिहाससंशोधकांनीं मान्य केलें आहे.)

शके १५७१ विरोधी संवछर ज्येष्ट शुध पूर्णिमा शाहाजी राजे कोंढाणास येऊन सोडिले. ते समई कान्होजी नाईक जेधे व दादाजी कृष्ण लोहकरे यांस सोडिले माहाराजांची व त्यांची भेटी जाली तें समई माहाराज बोलिले की तुम्ही अम्हामुळे बंदवानी श्रमी जालेस यांउपरी आम्हीं पातशाहासी तह केला की बारा गांवातून मजुरा करून हुकुम प्रमाणें कर्नाटक प्रांते मसलत करावी त्यावरून बेंगरूळ प्रांत पांचा लक्षा होनाचा जाहागिर दिल्हा आहे त्यांकरिता आपणास कर्नाटकाची मसलत करावी लागली तुमचे वतन मावळात आहे चिरंजीव राजश्री सिउबा खेडेबारीयांत व पुणा आहेत त्याजवळ तुम्हीं जंमावानसी राहावें. तुमची जबरदस्ती त्यां प्राते आहे अवघे मावळचे देशमुख देखील त्यासी रुजू होऊन त्यांचें आज्ञेंत वर्तत येसा विचार करून जबरदस्तीने राहावे येखादी मोगलाई कडील फौज व ईदिलशाही कडील फौज आली तरी आपण ईमान राखाव त्यांसी लढाई करावी येसी शफत ईमान पुरस्कर

बेलरोटीवर हात ठेऊन घेतली तैसीच त्याणी हि कान्होजी नाईकांस शोफत दिल्ही अणी कान्होजी नाईक यांस व दादाजी कृष्ण यांस वस्त्र देऊन बराबर हुजऱ्या व पत्रे देऊन राजश्री सिवजी राजे यांजकडे पाठविले ”

( भा. इ. सं. मं. संमेलनवृत्त शके १८३८ पान १७९–१८० )

इ. स. १६४६ सालांत तोरणा किल्ला घेऊन शिवाजीनें स्वराज्याची मुहूर्तमेढ रोविली. त्यानंतर चार वर्षांनीं वरील नोंदींतील घटना घडून आल्या. मागील विवेचनांत दर्शविल्याप्रमाणें शिवाजीच्या करवीं पुणें परगण्यांत स्वराज्यस्थापनेचा बेत शहाजी राजे यांनीं न ठरवितां शिवाजीची रवानगी पुणें प्रांतीं केली असती व शहाजी राजे यांची शिवाजीनें सुरू केलेल्या कार्यांस संमति नसती व तें त्यांस पसंत नसतें तर या नोंदींतील शहाजीचें जें धोरण वर्णिलें आहे तें कधींच अस्तित्वांत आलें नसतें, व शिवाजीनें चालविलेल्या कार्याविषयीं त्याचा त्यांनीं निषेध केला असता. शहाजीच्या अपेक्षेप्रमाणें शिवाजीच्या अद्वितीय कर्तबगारीमुळें व स्वराज्याच्या व स्वातंत्र्याच्या शहाजीच्या तालमेंत तयार झालेल्या राजकारणी मुत्सद्द्यांचें साहाय्य मिळाल्यामुळें स्वराज्यस्थापनेचें व स्वातंत्र्यसंपादनाचें कार्य उत्तरोत्तर वृद्धिंगत झालें व छत्र धारण करणारा स्वतंत्र राज्याचा राजा म्हणून इ. स. १६७४ सालांत शिवाजीस राज्याभिषेक झाला. स्वराज्यस्थापनेची मूळ कल्पना शहाजी राजे यांची असली तथापि बलिष्ठ अशा तत्कालीन तीन मुसलमानी बादशाही सत्तांशीं झगडून स्वराज्यस्थापनेचें अत्यंत बिकट कार्य शिवाजीनें स्वतःच्या अद्वितीय बुद्धिमत्तेनें व कर्तबगारीनें पार पाडलें.

आतां विठोजी राजे भोंसल्यांचे आठ पुत्र व त्यांचे वंशज यांच्या घराण्याच्या राजकीय चारित्र्याचा विकास कोणत्या पद्धतीनें झाला याचें त्रोटक दिग्दर्शन करितों. विठोजीराजे हे मालोजीप्रमाणेंच निजामशाही दरबारचे अंकित होते. मालोजीचा मुलगा शहाजी व विठोजीचे संभाजी, खेलोजी, मालोजी, नागोजी, परसोजी, त्र्यंबकजी, कक्काजी आणि संबाजी, हेही निजामशाही दरबारचे अंकित होते. निजामशाही दरबाराकडून मिळालेली पुणें परगण्याची जहागीर शहाजीस मिळाली. पुणें परगण्याचा प्रदेश निजामशाही अस्तंगत झाल्यावर विजापूरच्या आदिलशाहीकडे गेल्यामुळें व आदिलशाही दरबाराचा त्यानें आश्रय केल्यामुळें त्या जहागिरीचा उपभोग शहाजी घेऊं लागला. मोंगल बादशाहांनीं निजामशाही बुडविल्यावर तिच्या ताब्यांतील मुलूख मोंगल बादशहाचे ताब्यांत गेला. या मुलखांतील ज्या जहागिरी, इनामें, वतनें विठोजीराजे यांचे उपभोगांत होतीं तीं त्यांच्या आठ मुलांच्या ताब्यांत गेलीं व मोंगल बादशहाचे अंकित म्हणून विठोजी

राजांचे वंशज मोंगल बादशहांशीं राजनिष्ठ राहून त्यांच्याकडून सनदापत्रें घेऊन त्यांचा उपभोग घेऊं लागले. शहाजीच्या मृत्यूपावेतों तो आदिलशाही दरबारचा नोकर म्हणून राहिला. विठोजीचे पुत्र मोंगल बादशहांचे अंकित म्हणून राहिले. या घराण्यांतील शहाजी व त्याचे समकालीन विठोजीचे पुत्र यांच्या मनोरचनेंत व निष्ठेंत एका बाबीशिवाय कांहींएक फरक नव्हता. ही बाब म्हणजे मागील विवेचनांत दर्शविल्याप्रमाणें स्वराज्य व स्वातंत्र्यसंपादनाच्या कल्पनेचा शहाजीचे मनांत झालेला उगम व ती अमलांत आणण्याची शहाजीनें केलेली निश्चित योजना.

आतां दर्शविलेल्या या फरकामुळें या दोन्ही घराण्यांचीं राजकीय चरित्रें भिन्न स्वरूपाचीं बनलीं गेलीं. शहाजीसारखा कर्तबगार, पराक्रमी, राजकारणी पुरुष मालोजीच्या वंशांत उदयास आला नसता तर विठोजीचे वंशज ज्याप्रमाणें मोंगल बादशहांशीं राजनिष्ठ राहून त्यांस चिकटून राहिले त्याचप्रमाणें मालोजीचे वंशज विजापूरच्या आदिलशाही बादशहांशीं राजनिष्ठ राहून त्यांस चिकटून राहिले असते. विठोजी राजे यांच्या घराण्यांत शहाजीसारखा कर्ता पुरुष निघाला असता तर कदाचित् या घराण्याचें चारित्र्य मालोजीच्या घराण्यांतील शहाजी व शिवाजीराजे यांच्यासारखें बनलें असतें. शहाजी राजांना त्यांनीं त्या काळीं खेळलेल्या राजकारणी डावांमुळें त्यांस प्राप्त झालेला अनुभव व राजकारणांत त्यांस प्राप्त झालेली श्रेष्ठता व त्यांचे ठिकाणीं असलेलें शौर्य व पराक्रम यांमुळें स्वराज्य व स्वातंत्र्यस्थापनेच्या कल्पनेचा त्यांच्या मनांत उद्गम झाला. त्यांच्या तोलाचा पुरुष विठोजी राजे यांच्या घराण्यांत कोणी झाला नाहीं, यामुळें त्यांच्या घराण्यांतील पुरुष मोंगल बादशहांस चिकटून राहिले व शिवाजीनें आरंभिलेल्या महाराष्ट्राच्या उत्कर्षाच्या कार्यांत सामील झाले नाहींत.

आतां दर्शविल्याप्रमाणें या दोन्ही घराण्यांच्या राजकीय चारित्र्याची जी स्वाभाविक उपपत्ति झाली तींत विस्मयकारक कांहीं नसलें तरी सुरवातीस जो प्रश्न नमूद करण्यांत आला आहे त्याचें उत्तर शिल्लक राहातें, हें उत्तर पुढील विवेचनांत आलें आहे.

मानवी व्यवहारांत मग ते सामान्य दोन व्यक्तींतील असोत वा ते दोन मोठमोठ्या राष्ट्रांतील असोत मानवी प्राण्याच्या मनांत उदित होणाऱ्या भावनांपेक्षां त्या व्यक्तीचा स्वार्थ अधिक बलवत्तर व प्रभावशाली ठरतो व उच्च भावनेस बळी न पडतां ती व्यक्ति तिचा स्वार्थ ज्या मार्गानें साधेल त्या मार्गाचा अंगीकार करते. हा मानवी मनोरचनेचा धर्म बव्हंशीं मानवी व्यक्तीच्या व्यवहाराचें नियंत्रण करीत असतो. या धर्मान्वयें विठोजीराजे

यांच्या घराण्यांतील व्यक्तींनीं शिवाजीनें आरंभिलेल्या महत् कार्यांत मदत केली नाहीं व ते त्यास सामील झाले नाहींत यांत विस्मय वाटण्यासारखें कांहीं नाहीं हें दिसून येईल.

छत्रपती शिवाजी महाराजांनीं हातीं घेतलेलें महत् कार्य राजकीय क्रांतीच्या स्वरूपाचें होतें. विठोजीराजांचे वंशज हे मोंगल बादशाहाचे अंकित असून त्यांच्याकडून मिळालेल्या जाहागिरी, वतनें, इनामें यांचा उपभोग घेत होते. छत्रपतीस सामील झाल्यानें मोंगल बादशाहाच्या द्रोहामुळें त्यांची त्यांचेवर इतराजी होऊन त्यांना त्यांच्या जहागिरी, वतनें, इनामें यांस मुकावें लागलें असतें व त्यांच्या प्राणावरही संकट ओढवलें असतें. शिवाजीचे साह्यकारी झाल्यानें त्यांच्यावर ओढवणारी ही संकटपरंपरा टाळण्यास्तव ते त्यास सामील झाले नाहींत हें आतां नमूद केलेल्या मानवी मनाचें नियंत्रण करणाऱ्या तत्त्वाशीं सुसंगत आहे.

शिवाजीच्या ज्ञातीचीं व नात्याचीं अनेक तत्कालीन व नामांकित महाराष्ट्रांतील मराठी घराणीं व कांहीं ब्राह्मण घराणीं स्वार्थरक्षणासाठीं शिवाजीस सामील न होतां त्याच्या महत्कार्यापासून अलिप्त राहिलीं. त्याचप्रमाणें विठोजीचे वंशज शिवाजीचे अत्यंत निकटचे नातेवाईक असले तथापि ते त्याचेपासून अलिप्त राहिले. या घराण्यांचें हें स्वार्थी वर्तन महाराष्ट्राच्या उत्कर्षाच्या दृष्टीनें कितपत निंद्य व दोषास्पद आहे हा वादग्रस्त प्रश्न आहे. वेळोवेळीं झालेल्या अनेक राजकीय क्रांत्यांच्या इतिहासावरून असें दिसून येतें कीं, प्रचलित राजकीय सत्ता उलथून पाडून त्या ठिकाणीं नवीन राजकीय सत्ता स्थापन करणाऱ्या क्रांति घडविणाऱ्या पुढाऱ्यांस प्रचलित राजवटींतील जहागीरदार, इनामदार व वतनदार लोक सामील होत नाहींत. याचें कारण असें कीं, हे लोक क्रांतिकारास सामील झाल्यास त्यांच्या जहागिरी, इनामें व वतनें यांचेवर पाणी सोडण्याचें व स्वतःचे जीवितास मुकण्याचें महान् संकट त्यांचेवर येतें. नूतन क्रांतिकारास क्रांति यशस्वी करून नूतन राजकीय सत्ता प्रस्थापित करण्याचे कामीं यश येतें कीं नाहीं ही गोष्ट अनिश्चित असते व क्रांति अयशस्वी ठरल्यास या लोकांवर क्रांतींत सामील झाल्यास विद्यमान् राजसत्ताधाऱ्यांकडून येणारें संकट टाळण्याकरितां हे लोक नूतन क्रांतिकारापासून दूर राहातात.

इतिहासावरून दिसून येणाऱ्या या नियमास विठोजीराजे यांचे वंशज अपवाद नव्हते, व यामुळें त्यांचेकडून शिवाजीच्या महत् कार्यास कांहीं एक मदत झाली नाहीं.

रोहिडखोरें देशपांडे घराण्याचे ऐतिहासिक लेख म. इ. साधनें खंड १५ त प्रसिद्ध झाले आहेत. रोहिडखोऱ्याचा देशपांडे वतनदार दादाजी नरसू प्रभू शिवाजीस सामील झाला व बादशाही खजिना विजापूरच्या बादशाहाकडे न पाठवितां शिवाजीकडे त्यानें पोहोंचता केला. यामुळें त्याचेवर बादशाहाची अवकृपा होऊन त्याच्या जिवावर संकट ओढवलें (म. इ. सा. खंड १५ ले. २६७ पाहा). ही गोष्ट लक्ष्यांत घेतां विठोजीचे वंशज स्वतःचा स्वार्थ रक्षण करण्याची जी मनोवृत्ति तीस अनुसरून शिवाजीस सामील झाले नाहींत हें त्यांचें वर्तन गर्हणीय स्वरूपाचें मानणें सयुक्तिक नाहीं. डोळे उघडे ठेवून स्वतःच्या स्वार्थाची होळी व्हावयाची हें आपल्या मनांत निश्चित बाळगून नूतन क्रांति करणाऱ्या महान् अवतारी पुरुषास सामील होणारे लोकोत्तर पुरुष कोणत्याही राष्ट्रांत क्वचित् आढळतात. ही जगाच्या इतिहासावरून दिसून येणारी गोष्ट लक्षांत घेतां विठोजीराजे यांच्या वंशजांस शिवाजीस सामील न झाल्याबद्दल दोष देण्यांत मतलब नाहीं. विठोजीच्या वंशजांवर मागें नमूद केलेल्या आक्षेपांविषयींची चर्चा केल्यावर या घराण्यांतील पुरुषांच्या ठिकाणीं या खंडांत प्रसिद्ध केलेल्या ऐतिहासिक लेखांवरून कोणते गुण दिसून येतात ते नमूद करून हें निवेदन समाप्त करितों.

या घराण्यांतील पुरुषांच्या ठिकाणीं शौर्य, पराक्रम, जाज्वल्य स्वाभिमान व पराकाष्ठेचें धैर्य इत्यादि गुण असल्याचें दिसतें. राजरूप व रुस्तुम यांनीं, अलमगीरपूर पेठेंतील गुंडगिरी करणाऱ्या मुसलमानास देहान्त शासन करून पेठेंतील त्याच्या हवेल्या, गढी व मशीद जमीनदोस्त करण्याची व त्याचें व त्याच्या कुटुंबांतील माणसांचीं डोकीं कापून तीं स्वतःच्या वाड्याच्या दरवाजावर टांगण्याची जी बेडरवृत्ति व धैर्य दाखविलें तें प्रशंसनीय नाहीं असें कोणीं म्हणेल असें वाटत नाहीं. श्रीमंत भिकाजीराजे भोंसले यांनीं आपल्या निवेदनांत ही गोष्ट ज्या लेखांत नमूद केली आहे तो लेखांक (ले. ७६) वाचून हें कृत्य करणाराविषयीं सर यदुनाथ सरकार यांनीं प्रशंसापर उद्गार काढल्याचें त्यांनीं नमूद केलें आहे.

महाराष्ट्रांत स्वराज्याची स्थापना करून त्यास स्वातंत्र्य मिळवून देणाऱ्या छत्रपती शिवाजी महाराजांस Mis Guided Patriot (चुकलेल्या मार्गानें जाणारा देशभक्त) असें ज्या या आपल्या हतभागी देशांत म्हटलें जातें त्या देशात विठोजीराजे भोंसले यांच्या वंशजांतील रुस्तुम व राजरूपविषयीं सर यदुनाथ सरकार सारख्या नेमस्त व समतोल बुद्धीच्या एका नामांकित इतिहाससंशोधकानें प्रशंसनीय उद्गार काढावे हे एक भाग्यच समजलें पाहिजे.

राजवाडेसंशोधनमंडळाची स्थापना होऊन अठरा वर्षें पुरीं होऊन प्रस्तुत एकोणिसावें वर्ष सुरू आहे. राजवाड्यांचे हयातींत सन १९२६ सालापावेतों मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें या नामाभिधानाचे खंड २२ त्यांनीं प्रसिध्द केले. राजवाड्यांनीं अस्तित्वांत आणिलेली ही परंपरा त्यांचें स्मारक करणाऱ्या राजवाडेसंशोधनमंडळानें चालू ठेवणें हें त्याचें कर्तव्य होतें. त्यास अनुसरून कऱ्हाड-गिजरे घराण्याचे ऐतिहासिक लेख खंड २४ वा १६८ पानांचा मंडळानें प्रसिद्ध केला. त्यानंतर बापू गोखले पत्रव्यवहार हा इतिहाससाधनांचा ग्रंथ प्रसिद्ध केला.

त्यानंतर भांबोरकर भोंसलेंदप्तरांतील फारशी ऐतिहासिक लेख मंडळाच्या संशोधक त्रैमासिकांत छापण्यास प्रारंभ करण्यांत येऊन आतां स्वतंत्र पुस्तकाच्या रुपानें प्रकाशित होण्याचा सुयोग आला आहे. मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें मंडळाकडून जीं प्रसिध्द झालीं त्यांत या खंडांतील साधनें इ. स. १६३६ पासून १७०७ पावेतोंचीं म्हणजे महाराष्ट्रास स्वातंत्र्य व स्वराज्य प्राप्त करून देण्याच्या उद्योगाचा पाया इ. स. १६४६ त तोरणा किल्ला घेऊन शिवाजी महाराजांनीं घातला त्या पूर्वीच्या नऊ वर्षांपासून नूतन स्थापित केलेल्या स्वराज्यावर औरंगजेबानें आणलेलें प्राणान्तिक संकट इ. स. १७०७ सालीं त्याच्या मरणानें समाप्त झालें, त्या सालापावेतोंचीं आहेत. बापू गोखले पत्रव्यवहारांत मराठी राज्याच्या अस्तंगताच्या काळांतील इतिहाससाधनें आहेत. याप्रमाणें स्वराज्याचा उदय व अस्त या दोन टोकांमधील काळविभागाचे कऱ्हाड-गिजरे घराण्याचे ऐतिहासिक लेख आहेत.

याप्रमाणें मंडळानें १७ वर्षांच्या अवधींत केलेल्या ऐतिहासिक साधनांच्या प्रकाशनाचें स्वरूप आहे. भांबोरकर भोंसले घराण्याच्या दप्तरापैकीं रुस्तुमराव राजे यांच्या कारकिर्दीचे लेख मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड २६ भाग दोन छापणेचा मंडळाचा संकल्प आहे व राजवाड्यांच्या शुभ आशीर्वादानें तो सिध्दीस जाईल असा मंडळास भरवसा आहे.

धारचें पवार घराणें व भांबोरकर भोंसले घराणें यांचा परस्पर नात्याचा संबंध फार पूर्वींपासून कोणत्या प्रकारचा आहे याचें अल्प दिग्दर्शन या ग्रंथांत करणें अवश्य आहे. धार राजघराण्यांतील दहावे संस्थानाधिपती उदाजीराव पवार यांची मातोश्री ही भांबोरकर घराण्याची जी वंशावळ दिली आहे त्यांत नमूद असलेले शाहूजीराजे यांची कन्या होय. ही कन्या संभाजी ऊर्फ आबा सो मळठणकर यांस दिली होती. हिला एकच मुलगा झाला. त्याचें नांव भागूजी. तोच पुढें धारच्या राजघराण्यापैकीं ९ वे पुरुष आनंदराव यांस दत्तक दिल्यामुळें त्या संस्थानाच्या गादीवर बसला. त्याचें

नांव उदाजीराव ठेवण्यांत येऊन तो राजघराण्यांतला १० वा पुरुष झाला. शाहूजी राजे भांबोरकर यांचें कुटुंब तारळेकर महाडीक यांची कन्या सकवारबाई. हिची सख्खी बहीण राधाबाई ही धारच्या राजघराण्यापैकीं ९ वे पुरुष आनंदराव यांची बायको होती. यामुळें शाहूजीराजे भोंसले भांबोरकर हे महाराज आनंदराव पवार ( ९ वे पुरुष ) यांचे साडू लागत होते. शाहूजी राजे भोंसले हे या नात्याच्या संबंधामुळें प्रथम धारेस सन १८६६ सालीं महाराजा आनंदराव पवार ( ९ वे पुरुष ) यांचे कारकीर्दीत वास्तव्य करण्यास आले. शाहूजीराजे ह्यांना सकवारबाईंपासून एक मुलगी येसूबाई व एक मुलगा शंकरराव अशीं दोन अपत्यें झालीं. यांपैकीं येसूबाई ही महाराणी राधाबाई हिच्या बहिणीची मुलगी असल्याकारणानें हिच्यावर राधाबाईचें फार प्रेम होतें. पुढें राधाबाईनें ती मुलगी आपले सावत्र दीर आबासाहेब मळठणकर यांस दिली. तिचेपासून भागूजी या नांवाचा मुलगा झाला. त्यास महाराजा आनंदराव पवार यांनीं दत्तक घेतलें व त्याचें नांव उदाजीराव ठेविलें, व तो वर नमूद केल्याप्रमाणें आनंदरावाचे गादीवर १० वा पुरुष म्हणून बसला. या नात्याच्या संबंधामुळें भांबोरकर भोंसले घराण्यापैकीं भिकाजीराजे भोंसले व शंकरराव राजे भोंसले यांना धारच्या राजघराण्याचा आश्रयाचा लाभ झाला व ते धारेस मानमान्यतेनें राहात असतात व सरकारी नोकर या नात्यानें काम करतात. धार संस्थानाचे विद्यमान् अधिपति हिजहायनेस लेफ्टनंट महाराज आनंदराव पवार साहेब बहादूर यांचे जनक पिते कै. सेतूराम महाराज पवार मळठणकर व जनक माता पूर्व घरची सीताराजे संस्थानाधिपति नं. १० चे राजे उदाजीराव पवार धार यांच्या पत्नी महाराणी लक्ष्मीबाईसाहेब पवार केसर इ हिंद यांनीं सन १९२६ सालांत विद्यमान् अधिपतींना दत्तक घेतलें. विद्यमान महाराजांची जनकमाता सीताराजे व दत्तक माता कै. लक्ष्मीबाई या सख्ख्या बहिणी असून त्या सावंतवाडीकर राजांच्या मुली आहेत. धार संस्थानाचे विद्यमान् अधिपति लेफ्टनंट आनंदराव महाराज यांना सन १९४० सालीं संस्थानाचे पूर्ण अधिकार प्राप्त होऊन ते संस्थानचा राज्यकारभार चालवीत आहेत.



मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें

खंड २६ वा

# शिवकालीन घराणीं

श्री शिवछत्रपति यांच्या चुलत घराण्या पैकीं

## भांबोरकर भोंसले यांचें दप्तर



## भोंसले घराण्याची वंशावळ







ॐ ज्या नांवांमागें × अशी फुली केली आहे त्यांचा पत्रव्यवहार या ग्रंथांत छापला आहे.

लेखांक १ ] [ ता. २८ ऑगस्ट सन १६३६

مُهر اعلی

نقل فرمان از قرار بتاریخ ۲۸ شهریور ماه الہی سنه ۸ موافق ۶ شهر ربیع الثانی سنه ۱۰۴۶ هجری انکه چون خدمت دیسمکهی پرگنه جلگانوں از تغیر گنگاجی دیسمکهه سابق آن پرگنه حسب الالتماس عمدة الملک خان زمان به پرسوجی یا فرزندان مرحمت فرموده ام می باید که جاگیرداران و عاملان و دیشپانڈیان پٹیلان و رعایای حال و استقبال پرگنه مذکور مشارالیه را بلامشارکت غیری دیسمکهه آن جادانسته دست تصدهی اورا در آن خدمت قوی مطلق دارند و ازصلاح و صوا بدید خیالی او که هرآئنه مصدر دولت قواهی بوده باشد بیرون نروند سبیل مشارالیه آن که در آبادانی پرگنه و استمالت رعایا و افزونی مال دیوان مساعی جمله بظهور رسانیده بر رشته دولت خواهی باشد ازدست ندهد و از فرموده متخلف وانحراف نورزد ـــ مهر صاحب عالم برسالہ مرید خاص و فرزند کام اخلاص

دارا شکوه دارا شکوه

شرحه ستخط افضل خان

بمعرفت کمترین فدویان

افضل خان

भाषांतर

बादशाही मोहर

बादशाही हुकमाची नक्कल तारीख २७ शहरेवर सन ८ अथवा ता. ६ माहे रबीउल सानी सन १०४६ हिजरी असे कीं ज्या अर्थीं उमदतुलमुल्क खान जमान यांच्या विनंतीवरून जुने देशमुख गंगाजी यांना कमी करून जळगांव परगण्याच्या देशमुखीचें वतन परसोजी अथवा त्यांच्या मुलाच्या नांवें नेमून दिलें आहे त्या अर्थीं वरील परगण्याचे सर्व जहागिरदार, सरकारी अधिकारी, देशपांडे, पाटील व सर्व जनता यांनीं वरील इसमास तेथील देशमूख समजावें. या वतनांत दुसऱ्या कोणाचा वांटा नाहीं. यांचा अधिकार या वतनावर पूर्ण समजावा. तसेंच राज्याच्या कल्याणासाठीं जें कांहीं करतील तें सर्व जरूर मानावें व त्यांच्या आज्ञेबाहेर जाऊं नये.

वरील वतनाची अट अशी कीं परगणे मजकूरची लोकसंख्या वाढवावी, प्रजेंत संतोष वाढवावा, व सरकारी उत्पन्न वाढविण्याचे प्रयत्न दाखवावेत,

व सरकारी राज्याचें हित साधावें व सरकारी हुकमांची अंमलबजावणी करावी, ते अमान्य करूं नयेत.

मोहर साहेबे आलम ( जगाचे स्वामी )
दारा शिकोह

{ बरिसाला मुरीदे खास व फरजंदे अिखलास
दारा शिकोह }

सही अफजलखान
मार्फत नम्र सेवक
अफजलखान

---

लेखांक २ ] [ तारीख २९ माहे डिसेंबर सन १६५२
नं. ३१

اللّٰه اکبر

| |
|---|
| بندهٔ شاه جهان<br>سعداللّٰه خان |

چون حسب الحکم جهانمطاع لازم الانقیاد و نصب الارتباع مبلغ یازده لک و شصت هزار دام از پرگنه ماهوری من مضافات صوبه برار از خالصه شریفه من ابتدائی فصلخریف بوی پتیل مطابق تفصیل مسطور فی الضمن دروجه جاگیر سیاجی ولد پرسوجی بموجب یادداشت واقع تاریخ ۱۰ شهر شوال سنه ۲۶ که بتاریخ ۲۸ شهر مذکور بغرض مکرر رسیده مقرر گشته می آید که دیسمکهان و دیسپانڈیان و رعایا و مزارعان پرگنه مذکور مال واجبی و حقوق دیوانی را از قرار واقعی و راستی مطابق ضابطه و معمول مشارالیه جواب می گفته باشند واز سخن وصلاح و صوابدید خیالی او بیرون نروند - طریقه جاگیردار آن که در از دیاد آبادانی و معموری و برکت زراعت مساعی حمیده تقدیم میرسانیده باشد و بعلت ابواب ممنوعه درگاه جهان پناه مزاحم و متعرض نشود - تحریر فی التاریخ ۷ شهر صفر سنه ۲۶ از جلوس مقدس معلی

حسب المسطور عمل آرند *

भाषांतर

अल्लाहु अकबर ( ईश्वर सर्व श्रेष्ठ आहे )

सादुल्लाखान
बंदा
शहाजहान

ज्यांचा अधिकार मोठा आहे व ज्यांच्या हुकुमाची बजावणी होणें अवश्य आहे असा जगमान्य ( बादशहांचा ) हुकुम कीं अकरा लक्ष साठ हजार रुपये परगणे माहुरी सुभा वऱ्हाड येथील बादशाही उत्पन्नांतून तफसीलांत दिल्याप्रमाणें खरीफ हंगामाच्या आरंभापासून सयाजी वल्द परसोजी यांचे जहागीरींत दिले आहेत. याची नोंद तारीख १० माहे शव्वाल सन २६ च्या अर्जांत आहे व त्याची पुन्हा नोंद तारीख २८ माहे मजकुरीं झाली आहे. म्हणून परगणे मजकूरचे सर्व देशमुख, देशपांडे, शेतकरी व इतर सर्व लोक यांना कळविण्यांत येतें कीं सदरील सयाजी वल्द परसोजी यांना तेथील दिवाणी हक्क व इतर योग्य हक्क वहिवाटी व कायद्यान्वयें देण्यांत यावेत व त्यांच्या योग्य सल्लयाच्या व आज्ञेच्या विरुद्ध जाऊं नये. जहागीरदारांचें कर्तव्य असें कीं खेड्यांची व वस्तीची भरभराट करावी व त्यांच्या शेतीची उन्नति होईल असे स्तुत्य प्रयत्न करावेत, व ज्या बाबी सरकारांतून अमान्य असतील त्या वर्जाव्यात. तारीख ७ माहे सफर सन २६ जुलूस बादशाही.

लिहिल्याप्रमाणें घडवून आणावें

लेखांक ३ रा ] [ ता. २९ माहे डिसेंबर १६५२

الله اکبر

شاه جهان
بنده
سعدالله خان
۱۰۵۱

چون حسب الحکم جهان مطاع لازم الضیاد و نصیب الاتباع
مبلغ یازده لک و شصت هزار دام کہ پرگنہ ماهری مضافات صوبہ برار
از خالصہ شریفہ من ابتدای فصل خریف بوی پتیل مطابق تفصیل

مسطور فی الفسن دروجہ جاگیر سیاجی ولد پرسوجی بموجب یادداشت
واقعہ تاریخ شہرشوال سنہ ۲۶ کہ بتاریخ ۲۸ شہر مذکور بغرض
مکرر رسیدہ مقرر گشتہ می باید کہ دیسمکھان دیسپانڈیان و رعایا
و مزارعان پرگنہ مذکور مال واراضی و حقوق دیوانی شد از قرارا
واقع و وراثت مطابق ضابطہ و معمول مشارالیہ جواب می کنند -
واز سخن و صلاح و صوا بدید حالے او بیرون نروند - طریقہ
جاگیرداران کہ در از دیاد آبادانی و          و کثرت زراعت مساعی
جمیلہ تقدیم میر سانیدید و بعلت ابواب ممنوعہ درگاہ جہان پناہ
مزاحم و متعرض نشود تحریر اً فی التاریخ ۷ شہر صفر سنہ ۲۶
از جلوس مقدس معلے -

حسب المسطور عمل شد *

भाषांतर

| अल्लाहु अकबर<br>ईश्वर श्रेष्ठ आहे | सादुल्ला बंदा<br>१०५१ शाहजहान |
|---|---|

सरकारी खास हुकुम असा आहे कीं रुपये अकरा लक्ष साठ हजार कर्ज परगणे माहुरी सुभा वऱ्हाड खालसा शरीफ ( खाजगी उत्पन्नाचा भाग ) याचेवर खरीफाच्या पिकाच्या आरंभापासून खालीं तपशील दिल्याप्रमाणें सयाजी वल्द परसोजीच्या जाहगिरींत ता. २६ माहे शव्वालच्या यादीप्रमाणें ज्याची पोंच ता. २८ माहे मजकुरीं नोंदण्यांत आली आहे. या करीतां हुकूम दिला जातो कीं परगणे मजकूरचे देशमुख व देशपांडे व शेतकरी वर्ग यांनीं दिवाणीच्या सर्व बाबीं ( वारसा हक्कान्वयें ) विरासती प्रमाणें व कायद्यान्वयें वरील इसमास द्याव्यात व त्यांच्या सूचनाकडे व त्यांच्या कल्याणाकडे लक्ष द्यावें. जाहगीरदारांच्या रीतीप्रमाणें त्यानें लोकवस्ती व शेतीस उत्तेजन द्यावें व सरकारांच्या ज्या गोष्टी विरुद्ध असतील त्या न करण्याकडे लक्ष द्यावें. ता. ७ माहे सफर सन २६ जुलूस सरकारी.

लिहिल्याप्रमाणें अंमल झाला.



लेखांक ४ था ]    [ सुमारें इ. स. १६५३।५४

موافق دستور العمل باو وا گذارند و او متصرف بود- افزودنی
زراعت و عمارت پناهی حمیده بظهور رسانیده باش- سبیل شیخ

कै. म. म. द. वा. पोतदार,

داول مقدم قریہ مذکور آنکہ رعایا دیر آباد موضع مذکور را از سلوک خود راضی نگاهداشتہ موازی یکصد و پنج سی زمین بنجر موضع مذکور را کہ بغایت سنہ ۱۰۶۳ در آن قریہ مزروع ماندہ باعث بهراوع سازد و بافزودنی و آبادانی و مال گذاری تعدی بردارد - درین باب بنهایت تاکید دانستہ حسب المسطور العمل آورند وازخلاف آن محراو مطلب باشد - تحریر فی التاریخ صدر *

भाषांतर

❀ ... ... ... ... ... ... ... ... ... ... ...
चालू असलेल्या कायद्यान्वयें घेत जावा व त्याचा उपभोग घेत जावा. शेतीची भरभराट व राज्याचा बोज सारखा वाढवीत जावा. शेख दावलच्या मुकद्दमीची अट अशी कीं वस्तीस असलेल्या मौजे मजकूरच्या लोकांना पूर्ववत् राजी ठेऊन त्यांच्याशीं सलोख्यानें वागणें. आणि मौजे मजकूरची पडित जमीन बिघे १३५ एकशें पस्तीस सन १०५१ च्या आरंभापासून स्वतःच्या लागवडीस आणणें तसेंच सरकारी वसूल व त्याची वाढ यांबद्दल प्रयत्न करणें. या बाबतींत कडक ताकीद समजावी. व लिहिल्याप्रमाणें अंमल व्हावा.

---

लेखांक ५ ] [ ता. २७ फेब्रुवारी सन १६५४

الله اکبر

३

| خادم شرع |
|---|
| مهر ابو ایزادی |

نقل مطابق اصل است

بمُهر شاہ بیگخان

نقل

پروانہ از والاشان نوزدهم شهر ربیع الثانی سنہ ۱۰۶۴ موافق ۲۷ جلوس مقدس آنکہ متصدیان حال و استقبال و دیشپاندیان و عموم رعایا و جمهور سکنہ پرگنہ جلگانوں سرکار نرنالہ صوبہ برار بغایت اُمیدوار بود بدانند کہ چون بموجب فرمان قضا جریان و نشان سعادت عنوان و پروانہ شهادت و وزارت پناہ تلفتخان دیسموکهی پرگنہ

❀ [ सनदेंतील सुरवातीचा मजकूर फाटला आहे. केवळ सन १०५१ दिला आहे म्हणून महत्त्व आहे ]

مذکور بہ شجاعت و شہامت دستگاہ پرسوجی مع فرزندان مقرر و مسلم گشتہ می باید کہ مشارالیہ را دیشموکھی مستقل نمودہ مستور دانستہ لوازم دیسموکھے حسابی از موافق گذشتہ بتصرف مشارالیہ وا گذارند در خیالی صلاح صوا بدید شہامت دستگاہ مذکور بیرون نروند طریقہ دیسموکھے آنکہ رعایا را از حسن سلوک خود راضی نگاہداشتہ سعی در اِزدیادا۔ و معموری دیگر زراعت و عمارت نمایند ۔ درین باب تاکید دانید ۔

حسب المسطور بعمل ارند ثانیاً حال سنہ باشد ۔

भाषांतर

अल्लाहु अकबर = ईश्वर सर्वश्रेष्ठ आहे

नक्कल अस्सलप्रमाणें

| मोहर अबू येझादी खादिम शरा |
| --- |

शाह बेगखान यांच्या मोहरेनिशीं

नक्कल

बादशाही सनद तारीख १९ माहे रब्बीउल सानी सन २७ जुलूस अथवा सन १०६४ हिजरी ईने परगणे जळगांव सरकार नरनाळा सुभा वऱ्हाड येथील विद्यमान व पुढें येणारे सरकारी अधिकारी, देशपांडे, सर्व जनता व रहिवाशी यांना कळविण्यांत येतें कीं बादशाही हुकुमान्वयें आणि सरकार वजीर यांच्या सनदे अन्वयें वरील परगण्याचें देशमुखी वतन [ शुजाअत व शहादत दस्तगाह ] परसोजी भोंसले यांच्या नांवें त्यांना व त्यांच्या मुलांना देण्यांत आलें आहे. म्हणून ज्यांना सनद दिली गेली आहे त्यांनीं आपलें वतन कायम समजावें व देशमुखी वतनाचें उत्पन्न मागील सालांच्या हिशेबाप्रमाणें आपल्या स्वतःच्या खर्चासाठीं घ्यावें. तसेंच इतरांनीं त्यांच्या योग्य आज्ञेच्या बाहेर जाऊं नये.

देशमुखी वतनासंबंधीं अट अशी कीं प्रजेस आपल्या योग्य वागणुकी-मुळें खुश ठेवावें. तसेंच शेती आणि वस्ती यांची भरभराट होण्याचे प्रयत्न करावेत. या बाबतींत कडक ताकीद समजावी.

लिहिल्याप्रमाणें अंमल व्हावा.

---

लेखांक ६ ] [ ता. २८ एप्रील सन १६५४

نقل

پروانہ مہر ملتفت خان دیوان پس از جلوس از قرار بیست شہر جمادی الثانی ہجری سنہ ۱۰۶۴ انکہ گماشتہہای جاگیرداران و دیسموکہان و دیشپانڈیان و مقدمان و رعایا مزارعان قریہ نایگلے براعملہ پرگنہ جلگانوں من مقامات تہان گہات صوبہ برار بدانند کہ چون مسمی داول بوسیلہ متصدیان‌دار بعدالت بعرض رسانید کہ ازانوقت کہ اوٗ ما و تلجا و بہیما و ریوجی مقدمان قریہ مذکور باگنگا دیسمکہ متفق شدہ زاہرے و قطاع الطریقی می نمودہ اند و قریہ مذکور خراب افتادہ بود شجاعت دستگاہ پرسوجی جاگیردار و

دیسمکہہ پرگنہ مذکور راقم را طلب داشتہ بخدمت مُقدّمی موضع مذکور منصوب گردانیدہ کمترین مبلغ خرچ کردہ قریہ مذکور را آبادان ساختہ چنانچہ درآنوقت کہ قریہ مذکور را شجاعت دستگاہ پرسوجی مقدمی کمترین را مقرر گردانیدہ شصت زمین مزروع شود - والحال نہ یکصد یکری زمین زندہ و درنیوار داماد وغیرہ خویشان مقدمان می نسودند تاگنگا مقہور درانوقت متفق بودند - بعد از مدت نوزدہسال دعوی مقدمی مینمایند ور این باب متصدیان از عدالت العالیہ محمد بیگ امین پرگنہ مذکور نوشتہ بودند - جواب نوشتہ فرستادہ کہ بموجہہ رافععان واقعی ست و مبلغ بداتی داول مذکور بعہد نسود کہ موازی یکصد پنج بیگہ زمین قریہ مذکور را کہ بنجر است خویشان مقدمان مذکور بعہدہ برداشتن دردوسال نمی توانند کرد در دو سال بردارد - بنا ابرآن حسب الامر والاقدر رفع الشان مقدمی موضع مذکور شیخ داول مذکور مقرر و مفیض گشتہ می باید کہ ما الیہ را مقدم بلا شرکت عزت داشتہ -

भाषांतर

नक्कल

मुलतफितखानदिवाण यांच्या मोहरेची सनद ता॥० २० माहे जमादिउलसानी सन १०६४ हिजरी ईंने मौजे नायगली परगणे जळगांव ठाणघाट सुद्धां सुभा वऱ्हाड येथील जहागीरदारांचे गुमास्ते, देशमुख, देशपांडे, स्थायिक व शेतकरी यांना कळावें कीं दावल या नांवाच्या इसमानें सरकारी अधिकाऱ्यांच्या मार्फत वरिष्ठ न्यायालयांत अर्ज केला कीं उमा, तुळजा, भीमा व रेवजी मौजे मजकूरचे मुकद्दम यांनीं गंगा देशमुखाशीं हितसंबंध ठेवून जुलूम व छळ सुरू केला आहे. व त्यामुळें

वरील गांव ओस झाला आहे. यावेळीं शुजाअत दस्तगाह ( वीर वर ) परसोजी जहागीरदार व देशमुख परगणे मजकूर यांनीं मला ( अजेंदार दावल यास ) बोलाविलें आणि मौजे मजकूरच्या मुकद्दमीवर नेमणूक केली. त्या नंतर मी मुकदमीवर असता त्यांनीं फार थोडक्या खर्चांत वरील गांव वसविला. शेतीच्या साठ जमिनी होत्या आणि आतां एकशें जमिनी जिवंत ( वहितीस ) आहेत. सरकारची इतराजी झालेला गंगा आणि त्याचे नातेवाईक एकमत होऊन आज एकोणाविस वर्षांनंतर मुकद्दमीच्या वतनाचा हक्क सांगतात. या बाबतींत महंमद बेग अमीन परगणे मजकूर यांच्याकडे सरकारी अधिकाऱ्यांनीं विचारणा केली होती. त्यांनीं जवाब लिहून पाठविला कीं वरील नुकसानीची हकीकत अगदीं बरोबर आहे. आणि दावल यांच्याकडे रक्कम वसूल येणें लिहिली. त्यानें करार केला कीं वरील मौज्याची एकशें पांच बिघे जमीन माझ्या जिमें आहे व ती नापीक आहे यांतून दोन वर्षांत फेड करून द्यावी. यामुळें सरकारी हुकमाच्या आधारें मौजे मजकूरची मुकद्दमी शेख दावल याच्याकडे नेमली गेली म्हणून या इसमास स्वतंत्र मुकद्दम समजावें.



लेखांक ७ वा ] [ ता. ६ नोव्हेंबर सन १६५९

الله اکبر

رفعت و دعوانے پناہ شجاعت و بسالت دستگاہ سیاجی درین
را ہوار نموده بعافت باشد + بعد ہذا مسبور بعاند کہ بندگان نواب
مستطاب معلی لقاب دار العنایت عالیشان دکن السلطنت العظمی
عقید الخلافت رہگذاری بدولت واقبال بتاریخ ۲۵ جمادی الاول اصلہ
سنہ کوچ فرموده و بسواجہہ مسالک داخل شدند ترجیحا کہ براہگاہ
نیز متوجہ شوند- درباب رسدغلہ فرمودند کہ بجمیع فوجداران
و آمیلدان قدعی کمال نگاشتہ کہ رسدغلہ را برعیت کام پے در پے
براهگہ سزاوار برسانند لہذا نگارش میرود کہ آن رفعت پناہ
پرمقید کہ بنواہاداران و تجارہا غلہ را تاکید نموده روانہ سازند و
قدعی نمایند کہ چون رسیدن رسیداز کوتوال لشکر حاصل نموده
پیش شما بیارند آن زمان باورخواہند کرد درین باب زیاد نوشتہ
بشود کہ رسد خواہند فرستاد تا مجری تمامی بحضور نواب
ممالک مدار گردد- تحریر فی التاریخ غرہ جمادی الاول سنہ ۱۰۶۹

مافی الحال چون راه احمدنگر قراریافت باید که براه احمدنگر غله بفرستید *

| |
|---|
| ۱۰۶۹ |
| بلطف شاه عالمگیر |
| سید احمد آقاخان |

داخل شد بحضور پرنوا بتاریخ غره شهر جمادی‌لاول سنه ۱۰۶۹

भाषांतर

अल्लाहू अकबर

रफअत व दावानी पनाह, शुजाअत व बसालत दस्तगाह सयाजी यांचें कुशल असो.

आपणास कळावें कीं, बंदगान नव्वाब मुस्तताब, मौला अलकाब, दारुल-इनायात, आलीशान रुकनुल-सलतनतुल-अजमा, अकीदतुल-खिलाफत हे तारीख २५ जमादिलावल या तारखेस स्वारीवर निघाले असून लगतच्या प्रांतांत दाखल झाले आहेत. शक्य आहे कीं ते आपल्या प्रांतांत देखील येतील. त्यांनीं धान्य व वैरण याबद्दल फर्मांविलें आहे कीं सर्व फौजदार व अमीनांना कडकपणें कळवावें कीं धान्याची रसद एका मुक्कामाहून दुसऱ्या मुक्कामापर्यंत पोंचवावी. म्हणून लिहिण्यांत येतें कीं आपण आपल्या आसपासच्या सर्व व्यापारी लोकांना कडक ताकीद द्यावी कीं त्यांनीं धान्य पावतें करावें. व त्यांना बजावून द्यावें कीं जेव्हां ते लष्करांतील कोतवाला-पासून पावती घेतील व आपणास आणून देतील तेव्हांच ती आपण मान्य करावी. या बाबतींत आणखी आपणास लिहिण्यांत येतें कीं धान्याची रसद पाठवून द्यावी. म्हणजे त्याचा मुजरा सरकारांतून मिळेल. ता० १ जमादीलावल सन १०६९

तूर्त असें ठरलें आहे कीं स्वारीचा मार्ग अहमदनगर वरून आहे म्हणून धान्य अहमदनगरच्या मार्गानें पाठवावें.

सरकारकडे दाखल झालें
ता. १ जमादीलावल सन १०६९

१०६९
सय्यद अहमद
आकाखान
बलुतफ
शाह आलमगीर

लेखांक ८ वा ] [ ता. २६ माहे नोव्हेंबर सन १६५९

الله اکبر

| |
|---|
| بادشاه نمازے<br>بهادر<br>اورنگ زیب<br>سید احمد غلام |

رفعت و معانی پناه شجاعت دعوا‌ے دستگاه سیاجی محفوظ باشند - خطی که درینوار فرستاده بودید رسید + مضمون آن ضمیرنشین گردید آنکه درباب سر برداشتن مفسدان گردنواحی پرگنه پارنیر و تعین نمودن سوار و پیادهای جابجائی نوشته بودید قرین اطلاع گردید - رفعت پناه هامی دانند که در خبرداری هرامور آن جا ساعی و سرگرم خواهید باید تاباعث مجرای شما خواهد شد - وانکه درباب تعدی عاملان معزول امارت و اقبال پناه است واجلال دستگاه مرزا سلطان که درغیر هنگام رعایا را درقید نمودن زرتحصیل کرده گرفتند و تمام رعایا قریب سیصد بیست نفر غیر حاضر شده ند و بعضی هارا که درقید گزرانیده بودند انرا اخلاص کنانده و قریب

फाटकें

یکصد چهل نفر آورده ( درکشت وکار ) ودر آوردن آن هاسعی تمام منیماید - نیز معلوم گردید رفعت پناها باید که این مقدمه را خوب برخود لازم دانسته در آوردن رعایا دلاسا نمودن آنها دریغ نخواهید داشت - وعزت اثار گنگارام کروری برای امین خود بود باید که هرکاری که مشارالیه بشما رجوع آرد باتفاق اوفیصل دهند و متعاقب امین نیز تعین نموده خواهد شد - درین باب زیاده چه نوشته شود تحریر فی اتاریخ بست و یکم شهر ربیع الاول سنه ۱۰۶۹ *

भाषांतर

ईश्वर सर्वश्रेष्ठ आहे

| |
|---|
| सय्यद अहमद<br>गुलाम औरंगजेब<br>बहादुर बादशाह<br>गाझी |

रफअत व मुआनी पनाह शुजाअत व दावानी दस्तगाह सयाजी यांचे कुशल असो. आपण पाठविलेलें पत्र पावलें. पत्रांतील सर्व मजकूर ध्यानांत

आला. पारनेर परगण्याच्या भोंवतीं बंडखोरांचें पारिपत्य करण्याकरितां व तेथें पायदळ आणि स्वार ठिकठिकाणीं उभे करण्याकरितां आपण लिहिलें होतें तें सर्व समजलें. आपणास कळावें कीं आपण या बाबतींत जितकी खबरदारी व दक्षता घ्याल तीबद्दल आपणास मोबदला देण्यांत येईल. इमारत व इकबाल पनाह यांच्या नोकरींतून कमी केलेल्या सरकारी अधिकाऱ्यांच्या व जलादत दस्तगाह मिर्झा सुलतान यांच्या नोकरांच्या जबरीनें बिन हंगामाच्या वेळीं प्रजेस कैद केल्यामुळें व त्यांच्या जवळून सारा वसूल केल्यामुळें जवळ जवळ तीनशें वीस लोक गांव सोडून गेले व कांहीं कैद झाले हें सर्व वृत्त समजलें. आपण या सर्व लोकांना मुक्त करावें. तसेंच जवळ जवळ एकशें चाळीस लोक जे आले आहेत त्यांना शेतीच्या कामीं लावण्याचा प्रयत्न करावा. आपणास कळावें कीं या बाबतींत आपण स्वतः अती दक्ष राहावें व त्या लोकांना राजी राखण्यांत किंचित् कसूर करूं नये.

इज्जत आसार ( सन्माननीय ) गंगाराम यांना आपण आपलें अमीन नेमलें आहे. त्यांनीं जें कांहीं काम त्यांना देण्यांत येईल तें त्यांनीं आपल्या सल्ल्यानें करीत जावें. शिवाय अमीनाचे मददगारही नेमावेत. या बाबतींत जास्त काय लिहावें. ता॰ २१ माहे रब्बीलावल सन १०६९

---

लेखांक ९ वा ] [ ता॰ २ माहे मार्च सन १६६०

الله اکبر

| |
|---|
| شاه عالمگیر<br>بنده ۱۰۶۹<br>سید محمد اقاخان |

چون حسب التجویز نواب مستطاب معلی القاب عالمتاعات
رکن السلطنت العظمی عرضیه بخلافت الگری خدمت فوجداری و
امینی پرگنه کرّےولیت سرکار احمدنگر صوبه دکن بعهده واهتمام
رفعت پناه سیاجی ولد پرسوجی بهونسله مع پسران مقرر و مفوص
گشته باید که دیشموکهان و دیشپانڈیان و مقدمان و جمهور سکنه و
عموم متوطن پرگنه مذکور مشارالیه را فوجدار و آمین انجا مستقل
دانسته ازصلاع خیالی مشارالیه که بهر آئینه متضمن نگاهی سرکار و
رفاهیت رعایا بوده باشد بیرون نروند و سعید تمام و آمادگی
بندوبست و ضبط و ربط از قرار واقعی بوجه چنان کند که تعدی

را از مفسدان محصول آنوقت مجال تمردو فساد نماند و درنگو زراعت و توفیر عمارت نوعی مساعی موجود بکاربرد که فواین گاه فرحت پرگنه روبادانی آرد و تجمیع کمال برسد درین باب تاکید دانسته حسب المسطور بعمل آرند *

تحریر فی التاریخ ۲۹ شهر جمادی الثانی سنه ۱۰۶۹

भाषांतर

अल्लाह्-अकबर ( ईश्वर सर्व श्रेष्ठ आहे )

सय्यद महंमद
आकाखान
बंदा १०६९
शाह आलमगीर

परगणे कडेवळीत सरकार अहमदनगर सुभे दक्षिण येथील फौजदारी व आमिनीची मनसब नवाब मुस्तताब मौला अलकाब रूकनुलसल्तनत यांचे हुकमावरून रफअत पनाह सयाजी वल्द परसोजी भोंसले यांचेकडे व त्यांच्या मुलाकडे नेमली गेली आहे. म्हणून परगणे मजकूरचे देशमुख, देशपांडे, मुकद्दम व सर्वसाधारण लोक यांनीं सयाजी राजे यांना तेथील फौजदार व अमीन कायम समजावें. ते सरकार व प्रजा या दोहोंच्या हिताकरितां जो कांहीं सल्ला देतील अथवा ते जें कांहीं करतील त्याच्या विरुद्ध जाऊं नये. तसेंच त्यांनीं बंदोबस्ताचे कामांत इतका प्रयत्न करावा कीं शत्रूंचा जुलूम न व्हावा व बंडखोरांना गैरवाजवी वसूल घेण्याची हिम्मत न व्हावी. तसेंच आपल्या हद्दींतील शेतीची उन्नति करण्यांत सर्वतोपरी प्रयत्न करावेत. व यामुळें परगण्याची वस्ती व भरभराट उर्जितावस्थेंत जावी. या बाबतींत कडक ताकीद समजावी. व लिहिल्याप्रमाणें करावें. तारीख २९ माहे जमादिलसानी सन १०६९.



लेखांक १० वा ] [ ता. २२ जानेवारी सन १६६२

نقل

پروانچه نواب مستطاب معلی القاب سیادت و نقابت پناه وزارت و معالی دستگاه مدارالمهامی بتاریخ بیست ودوم شهر جمادی الاول سنه ۵ انکه گماشته های جاگیرداران و دیسمکهان و دیشپاندیان و مزارعان پرگنه کرے ولیت سرکار احمدنگر بدانند که درباب وصول اقساط مطالبه امرایان عظام و منصبداران کرام از درگاه

مقدس العالی تاکید تمام است بناء برآن حسب الفرموده نواب مستطاب معلی القاب عالمنای رکن السلطنة العظمی رفعت پناه کمال خادم را بجهت تحصیل وجه مطابق منصداران مسطوره فی الضمن مقرر نموده شد که برعیت تمامتر مبلغی مذکور را از محال جاگیر آنها بتحصیل در آورده عاید خزانه عامره سازد و نگذارند که تاز راقساط بوصول نرسد گماشته جاگیردار بکدام برداشت تواند کرد - باید که مومی الیه را تحصیلدار مستقل دانسته در وصول وجه مذکور بهیچوجه مزاحم نشود - عذروالتجای وحیله و حرکت ننماید که نتیجه نیک نخواهد یافت و سوای زر قسط مرقوم یکفلوسی به تحصیلدار ندهند اگر ثانی الحال ظاهر خواهد شد گماشته جاگیر سزا میرسد و دیسمکهان و دیسپاندیان از وطن برطرف خواهند شد - خبر شرط است - دراین باب تاکید تمام دانسته حسب المسطوره عمل آرند از تخلف و انحراف تحریر بانسته - تحریر فی التاریخ صدر نبوستگی پروانه بتاریخ بیست دوم ماه جمادی الاخر سنه ٥ جلوس معلی مطابق سنه ۱۰۷۳ *

مصدره شرح ضمن قسط از جمله مطالبه سرکار خالصه شریفه که برذمه جماعه ذیل طلب است در فصل خریف بارش و ربیع کوسمال سل سنه ۱۰۸۳ از محال جاگیر مشارالیه تحصیل نمود بخزانه عامره عاید سازند *

عرض اقدس تعین آنکه منکه کمال خان ولد جمال خان منصبدارم قبول نموده‌یم چون تحصیل مطالبه قسط سنه ۱۰۷۲ بموجب پروانه علحیده بعهده بنده درگاه مقرر شد که از محال جاگیر آنها بازیافت نموده بخزانه عامره عاید سازم - اگر گماشته های جاگیرداران بهانه نمایند بحضور خبر نمایم و یکدام برداشت نکنم اگر برداشت نمایم از منصب و جاگیر برطرف باشم - بتاریخ ۱۰ شهر جمادی الثانی سنه ٥ جلوس والا *

نسا ختنی ذمه پرسوجی
۳۱۲۱۴ پرگنه کرےولیت

خان تبزه
۳۳۶۳۳ از پرگنه کرےولیت

قست باقی دست کردخان
۲۷۶۳۳ ۲۰۰۰

نتهوجی ولد ناروجی عدد پرگنه
کرےولیت ۲۰۰۰۰

راياجی ولد دناجی گهوپڑے
۵۵۰۰

عدد پرگنہ کڑےولیت ۵۰۰۰

دگر

از جملہ معاون داران

راکھوجی ولد نتھوجی

۱۱۳۷ روپیہ کڑےولیت

درنیدار

از جملہ معون داران

۶۱۶۴۱ قیسط

عدد مقرر شد

भाषांतर

नवाब मुस्तताब मौला अलकाब सयादतपनाह वजारत व मुआली दस्तगाह मदारुल महाम ( पंतप्रधान ) यांचा हुकूम तारीख २२ माहे जमादिलावल सन ५ असा कीं:—

परगणे कडेवळित सरकार अहमदनगर येथील सर्व जाहागीरदारांचे गुमास्ते व देशमुख व देशपांडे व शेतकरी लोक यांना कळावें कीं मान्यवर अमीर व महान मनसबदारांच्या हक्कांच्या वसुलीसंबंधीं सरकार पादशाह सलामत यांची कडक ताकीद अशी आहे कीं व म्हणून नवाब मुस्तताब मौला अलकाब रुकनुल सलतनत रफअत पनाह यांचा हुकूम असा आहे कीं त्यांनीं व त्यांच्या सर्व नोकरांनीं खालीं दिलेल्या तपशिलाप्रमाणें मनसबदारांचे हक्क वसूल करावेत. ही रक्कम ज्यांनीं त्यांनीं आपआपल्या परगण्यांतून प्रजेकडून सर्वच्या सर्व वसूल करून सरकारी खजान्यांत भरणा करावी. व जोंपर्यंत ही रक्कम वसूल होणार नाहीं तोंपर्यंत तेथील गुमास्ते लोकांनीं कोणाही इसमास सोडून देऊं नये. म्हणून या गुमास्त्यांना तेथील कायम तहशीलदार ( कर वसूल करणारा अधिकारी ) समजून त्याच्या वसुलींत कोणत्याही प्रकारचा अडथळा करूं नये. तसेंच कोणत्याही प्रकारची विनंति अथवा हिल्ला हवाला देऊं नये. हा हुकूम न मानल्यास त्याचा परिणाम चांगला होणार नाहीं. तसेंच तहसीलदारांना ठराविक रकमेच्या वर एक पैसाही जास्त देऊं नये. जर याच्या विरुद्ध दिसून आलें तर त्या जाहागीरदाराच्या गुमास्त्यांना शिक्षा करण्यांत येईल. आणि तेथील देशमुख व देशपांडे यांना त्यांच्या वतनावरून कमी करण्यांत येईल. मात्र याची बातमी मिळाली पाहिजे. या बाबतींत कडक ताकीद समजून हुकुमाप्रमाणें अमल व्हावा व याच्या उलट जाऊं

नये. ता॥० सदर. हुकुमाची तारीख २२ माहे जमादिलाखिर सन ५ जुलूस किंवा १०७२.

बादशाही प्रांतांतील वसुलाचा शेरा खालील प्रमाणें:—

हा वसूल खरीफ व रब्बीच्या हंगामावर सन १०७२ सालापासून आकारणी करून सरकारी खजान्यांत दाखल करावा:—

मी सरकारशीं असा करार करतों कीं सन १०७२ सालाच्या वसुलावर पादशाही हुकुमाप्रमाणें ( जो मला स्वतंत्र पोंचला आहे ) आकारलेला कर जहागीरदारांच्या प्रांतांतून वसूल करून सरकारी खजान्यांत भरणा करून देईन. जर जाहागीरदाराचे गुमास्ते कांहीं निमित्त दाखवितील तर त्याची खबर सरकारकडे देईन. आणि एक पैसाही वर वसूल करणार नाहीं. जर जास्त वसूल करीन तर मला आपल्या जागीर व मनसबीवरून रद्द करण्यांत यावें. कमालखान वल्द जमालखान मनसबदार तारीख १० माहे जमादिलावलसानी सन ५ जुलूसवाला.

४९४६

।=

खान तबाजा . परसोजी यांचे जिम्मे

परगणे कडेवळित ३३ हजार ६३३ ४१ हजार २१४

किस्त बाकी कडेवळित

२७ हजार ६३३ ६ हजार ४२०

नथोजी वल्द नारोजी परगणे कडेवळित

२० हजार

रायाजी वल्द दत्ताजी घोरपडे

५ हजार पांचशे

इतर

पांच हजार

राखोजी वल्द नथोजी

११२७ कडेवळित

५०० सर्व भागीदाराकडून

८६७ सर्व भागीदाराकडून

॥=

६१ हजार ६४१ किस्त

लेखांक ११ वा ] [ ता. २९ आक्टोबर सन १६६३

موافق اصل است

| |
|---|
| خادم شرع محمدی<br>مهر قطب الدین قاضی |

نواب وزیرخان

نقل پروانه بمهر نواب مستطاب معلی القاب - از قرار بتاریخ هفتم شهر ربیع الثانی سنه ۶ جلوس والا مطابق سنه ۱۰۷۴ هجری انکه متصدیان مهمات حال و استقبال و دیشپانڈیان و مقدمان و مزارعان و سیتهه و مهاجنان و رعایا پرگنه جلگانون سرکار نرناله صوبه برار بدانند که چون سابق از قدیم الایام خدمت دیشمکهی و مقدمی چند دیهات پرگنه مسطور به پرسوجی بهونسله تعلق است و در عمل عمدة الملک امیرالامرای چون پرسوجی مذکور بحضور پرنور رفته بود عبدالخالق ولد کنکاباکهه نامی به خدمت مذکور دخل نموده درنیوار ظهور پیوست که او خدمت دیشمکهی پرگنه مذکوره را چنانچه باید بجا نیاورده و رعایا ازو نارضامند است لهذا خدمت مسطوره را بدستور سابق شجاعت دستگاه سیاجی بهونسله مقرر و مفوض گشته باید که مشارالیه را دیشمکهی دهند و چند دیهات مستقبل انجا داشته انچه وظیفه خدمت مذکور بوده باشد باو وا گذارند - طریقه مومی الیه انکه خدمت مذکوره را از روی راستی و دولتخواهی و آبادکاری بجا آورده دقیقه آن و مالی غیر مزرعی نگزارد و چنان سعی بکار برد که آبادانی و معموری پرگنه بیشتر از بیشتر گردیده هر سال درجمع بیفزاید - درین باب قدغن کمال لازم دانسته بموجبی که در هرباب قلمی شده عمل مانید - تحریر فی التاریخ صدر

شرط دولتخواهی و آبادانکاری اگر درین سال اثر ظاهر شد پردوام خواهد بود -

भाषांतर

नकल असल प्रमाणें

| |
|---|
| मोहर काजी कुतबुद्दीन शरा महंमदीचे सेवक |

नवाब वजीरखान

नवाब मुस्तताब मौला अलकाब यांच्या मोहर परवानगीनिशीं असलेल्या सनदेची नकल. ता. ७ माहे रब्बीउलसानी सन ६ जुलूस अथवा १०७४

نیکی ہمین خواہد بود - این معنی از شاہان شما بعید است و
مبلغ صدر حوالہ مہمات شجاعت انار شیخ ساکن نمودہ رسید و
تمسک خود بغیر نو فرین مادہ نہایت تاکید دانند تحریر
فی التاریخ ۱۷ شہر شعبان سنہ ۴۰ جلوس والا +

भाषांतर

ईश्वर प्रसन्न असो

शुजाअत शुआर ( वीर ) अबदुल्ला यांचें कुशल असो:—

आपणास कळावें कीं आपण सरकारांतून एक हजार एकशें चौऱ्याहत्तर रुपये एक महिन्याच्या वायद्यानें कर्ज घेतलें आहे. आणि जवळ जवळ आठ महिने झाले तरी वरील रकमेच्या देण्यास वेळ लावीत आहांत. खेरीज इकडच्या सरकारी अधिकाऱ्यांशीं आपली वागणूक सलोख्याची नाहीं. इतकेंच काय पण आपण आपलें कर्तव्य नीटपणें करीत नाहीं. जें कांहीं करतां तें वेडेपणाचें व नासमंजसपणाचें असतें. जेव्हां नवाब खानफरोज जंग यांनीं आपणास ( शुजाअत शुआर यांना ) आपल्या वंश परंपरागत वतना वरून काढून टाकलें व हुसकावून लावलें तेव्हां त्यांच्या हुकमाची अंमलबजावणी करण्यांत जाणून बुजून टाळाटाळी केली व नम्रपणाच्या ऐवजीं भांडणापर्यंत मजल गेली. आपल्याकडे जी रक्कम येणें आहे व जी वसूल करणें अवश्य आहे ती एक एक रुपया देऊन कचेरींतून कर्जरोखा परत घ्यावा. ही गोष्ट ध्यानीं आणावी आणि सर्व शहाणपणें काम करावें. जितकें लवकर ही रक्कम देण्यांत येईल तितकें चांगलें. असें न झालें तर तुम्हास पश्चात्ताप करण्याची पाळी येऊन तुमचे कडून रक्कम वसूल केली जाईल. असें करणें आपल्या मोठेपणास न शोभणारें आहे. तरी वरील रक्कम मुहम्मात शुजाअत शेख भीकन यांच्या स्वाधीन करून पावती व कर्जरोखा स्वतः घ्यावा. या बाबतींत कडक ताकीद समजावी. ता० १७ माहे शाबान सन ४० जुलूस.



लेखांक ८८ वा ] [ ता० १४ आगस्ट सन १६९८

نقل پروانہ بمہر حمیدۃالملک اسدخان آنکہ دیشپانڈیان و
و دیشمکھان و مقدمان و رعایاء مزارعان پرگنہ کڑی ولیہت سرکار
احمدنگر صوبہ خجستہ بنیاد بدانند کہ چون مبلغ پانزدہ لک و

ہشتاد ونہ ہزار دام از پرگنہ مذکور از نصر برہان اللہ خان من ابتدای
مختصر حسب الضمن بجاگیر اوز بیگخان وغیرہ مقرر شد باید کہ
مال واجب و حقوق دیوانی را از قرار واقع وداے بروقت و ہنگام
موافق ضابطہ معمول مستمر بگماشتہ خان مذکور وغیرہ جواب

میگفتہ باشند و از سخن وصلاح صوابدید او بیرون نروند سبیل گماشتہ مذکور آن کہ رعایاے حالی و پرائی را از حسن سلوک خود راضی درشتہ در تکبر زراعت و افزودنی آبادانی سعی فرادان بکار برد - بتاریخ ہفت و دہم شہر صفر المظفر سنہ ۴۲ جلوس والا نوشتہ شد -

و از بابت ناندنیج کہ جاگیر محمد یوسف شدہ است -

भाषांतर

हमीदतुलमुल्क असदखान यांच्या मोहरेच्या हुकुमाची नक्कल अशी कीं परगणे कडेवलित सरकार अहमदनगर सुभा खुजस्ता-बुनियाद येथील सर्व देशपांडे, देशमूख, मुकद्दम, जनता व शेतकरी यांना कळावें कीं पंधरा लक्ष एकोणीस हजार दाम परगणे मजकूर पैकीं जे बुन्हानुल्लाखानकडे होते ते ह्या महजर ( सनद ) च्या आरंभापासून ऊजबेगखान वगैरेंच्या जहागिरींत नेमले गेले आहेत. म्हणून योग्य वसूल व दिवाणी हक्क हंगामाचे वेळीं व कायद्याप्रमाणें खानसाहेबांच्या गुमाश्त्यांना देत जावे. व त्यांच्या योग्य सल्ल्याच्या आणि कल्याणाच्या विचाराच्या विरुद्ध कोणीं जाऊं नये. गुमास्ते मजकुरांना अट अशी कीं सर्वसाधारण जनतेस आपल्या सौजन्यानें राजी ठेवावें तसेंच शेती व वस्तीच्या वृद्धीचे प्रयत्न करावेत. लिहिलें ता। १७ माहे सफर सन ४२ जुलूस.

नादनजची जहागीर महंमद युसूफ यांच्या नांवें आहे.



लेखांक ८९ वा ]

خادم شرع شریف
۱۱۰۱
مہر منیر بن ابوترابی

مظہر خواہد شد

شاہی

۱۱۰۲
شری مل لاہوری

بندہ درگاہ رستم
بن سیاجی

باعث تحریر این معنی آنکه در محکم تهانه قصبه ناندنج
پرگنه کڑےولیت سرکار احمدنگر صوبه خجسته بنیاد واقع بتاریخ
نهم شهر جمادی الثانی سنه ۴۱ جلوس والا انکه چون پتواریان قصبه
مذکور مناقشه وطن‌داری درمیان خود ها میداشتند و بعدالت
العالیه جناب به بهادر گشته استغاثه شده امیر جلیل القدر بمهر
هدایت خان دیوان بنام انبازخان فوجدار اشتی آوردند خانعزاله
جهت شاهدی هالے موالی قصبه مذکور طلب نمودند پرتاب نام
سوار و سناوند سوار مذکور بعد رسیدن قصبه مذکور جای ماندن
خود را در پیتهه عالمگیر پور عمله قصبه مسطور گرفته و بعد
یکهو نه دو پهر بست گذشته بود که پرتاب مذکور از دست
دزدان یاکسی مدعی وا گشته شده دپے دزدان درتعلقه موضع چوله
عمله پرگنه مذکرر برآمده ـ بموجب آن محضرداست
گشت ـ بعد از آن شاه ملک پسر تاهرخان تهانه دار تهانه
مذکور که از طرف ضمانت شاهی عبدالله نائب خود را نویشت که
باعث خون شدن چیست جمع اهالی و موالی قصبه و سیتهه و مهاجن
پیهه مذکور را طلب نمود عبدالله اهالی و موالی قصبه سیتهه و
مهاجن پتواری پیتهه مذکور را جمع کرده در اشتی بحضور خان
مذکور برده آن برخانمشارالیه انصاف بموجب محضر نه نموده چون
داے برمقدم قصبه ویتهه مهاجن پیتهه مذکور مقرر کردند و جهت
بدست آوردن از خود تهاکر ان پرتاب را در پیتهه مذکور و گنگارام
نامی سوار در قصبه مرقوم فرستادند تا چون فرزندان پرتاب متوفی
هم بن وغیره جای بودنی خود را در طویله راجروپ جاگیردار و
سیته هیتهه عالمگیر پور گرفته دریصورت بگماشه نوشته راه سلوق
درمیان آورده وجهه دانه و کاه را مقرر کرده ازو گفت که تا ادای
از مذکور باشد + چنانچه واقعه بتاریخ هشتم شهر. مذکور دو پهری
شب آخر بود که پسران خونی که جهت از آمده بودند کمندانداخته
در حویلی راجروپ جاگیردار در آمدند ـ آنچه مال و مطاع یافته
بغررت برداشته و چند کشان راجروپ را از سنگ زخمی ساخته اند
درین شدن ژلف بیگ گرزدار که برای سزاولی رسد غله آمده بود که
بموجب حکم جهان مطاع رسد به تهنه تاز و سرون و سیوارپور
پرساند گنگارام سوار ملازم سرکار خان مذکور حاضر بودند بمجرداستماع

این واقعه آمده هرچند که مخوف به پسران خونی نموده اند نه فهمیده و گفته کسی را بجاطر نه آورده اند - تعدی کرده اید هرکس ازین اگاهی داشته باشد - برای عزیز نشانی خود داند نیست نماید - والا

भाषांतर

कसबे नादनज परगणे कडेवळित सरकार अहमदनगर सुभा खुजस्ता बुनियादच्या ठाण्यातर्फे जाहिरनामा तारीख ९ माहे जमादिलसानी सन ४१ जुलूस या विषयीं कीं कसबे मजकुराच्या कुळकर्ण्यांत वतनासंबंधीं भांडण होतें. त्यांनीं बहादुरगडास वरिष्ठ कचेरींत फिर्याद दिली. दिवाण हिदायतखान यांनीं आपल्या मोहरेचा हुकूम अष्टीचे फौजदार अंबाजखान यांच्या नांवें असा दिला कीं कसबे मजकूरच्या सर्वसाधारण लोकांस त्यांनीं बोलवावें. घोडेस्वार प्रताप हा लोकांना बोलावण्यास पाठवला गेला. हा स्वार आलमगीर पेठ मध्यें एके जागीं राहिला. दोन प्रहर रात्र झाल्यानंतर वादीनें अथवा कोणी आणखी इसमानें ह्या प्रताप नांवच्या घोडेस्वारास ठार केलें. नंतर कांहीं चोर परगणे मजकुराचे मौजे चोळें येथें आले व त्या प्रमाणें हा जाहिरनामा तयार करण्यांत आला. नंतर वरील ठाण्याचे ठाणेदार शाह मलिक वल्द ताहिरखान यांनीं आपले नायब अबदुल्ला यांना लेखी विचारलें कीं ह्या खुनाचें कारण काय आहे? त्यांनीं कसब्याचे सर्व शेटे, महाजन व सर्वसाधारण लोकांना बोलावून विचारावें. अबदुल्ला यांनीं पेठेंतील सर्व लोकांना, महाजनांना, शेट्यांना व पटवाऱ्यांना खानसाहेबांच्या समक्ष अष्टीस बोलाविलें. खान मजकुरांनीं न्याय बरोबर दिला नाहीं. तर आपल्या भावाला (?) पेठेचे शेटये व महाजन नेमलें. पैसे आणण्या करितां प्रतापच्या ठाकुरांना पेठेंत व गंगाराम नांवाच्या स्वारास कसब्यांत पाठवून दिलें. इतक्यांत मृत प्रतापाच्या मुलांनीं राजरुप शेटये व महाजन यांच्या तबेल्यांत प्रवेश केला. शेटये यांच्या गुमास्त्याच्या मध्यस्तीनें गवत व धान्य कबूल करून घेतलें. व म्हणाले कीं वरील प्रकरणाचे पैसे द्या. ही गोष्ट ता. ८ माहे मजकूरच्या रात्रीचे शेवटीं घडलें. वरील मयत झालेल्या माणसाच्या मुलांनीं हवेलीवर फासे फेकले व हवेलींत उतरले. जो कांहीं माल व जें कांहीं धन सांपडलें तें सर्व लुटून नेलें. राजरूपच्या माणसांना दगडांनीं जखमी केलें. ह्याच दरम्यान जुलुफबेग वल्द लतीफबेग भालेदार सरकारी कामाकरितां येथें आला. त्यानें ही बातमी ऐकिली. मयताच्या मुलांस फार समजाविलें परंतु तें त्यांनीं मुळींच ऐकलें नाहीं उलट जास्त

जुलूम करूं लागले. म्हणून ज्यांनीं ही बातमी ऐकिली व ज्यांनीं हें डोळयांनीं पाहिलें त्यांनीं याची साक्ष द्यावी.

श्रीमल लाहोरी
११०२

रुस्तुम बिन सयाजी
दरगाहाचें सेवक

( मराठींत )

नीइयानी
राजरूप
ठ सेवक ठ

---

लेखांक ९० वा ] [ ता. १ नोव्हेंबर १६९९

خادم شرع شریف
ابوترابی ۱۱۰۱
مهر منیر بن

بادشاه حی

باعث تحریر اینمعنی آنکه بحضور قاضی واهالی و موالی پرگنه کڑےولیت سرکار احمدنگر صوبه خجسته بنیاد بتاریخ هشتدهم مهر جمادی الاول سنه ۴۳ جلوس والا انکه نراین را از خانوالاشان مرتبت جهان از سبب غنیم لئیم درقید کرد برده بود بعد از چند روز از قید خان مذکور گریخته باز یه قصبه مذکور آمده و نوکر مرزا محمد یوسف شده خدمت فوجداری و شقداری گرفته آن را و عبداللہ پرداول که امادت منزلت خانفروز جنگ بدر کرده بودند و هم از و متحقق شد که باز نو آباد کرده حاصل کو نبی وغیره به گماشته راجروپ جاگیردار سایر مزاحم بشود و گرفتن نمیدهند و عمل جاگیردار و شقداری کردن نمی دهد ـ و در هر یک مانع و مزاحم بشود و تنخواه یکهزار پانصد روپیه است درین ۳ صد و ۴ صد روپیه وصول نمیشود و در هر سال نقصان هزار روپیه مشود ـ و پیشتیها سال بسال دو سه هزار روپیه در پیٹھ عالمگیر پور مشود ـ بنا بر آن پیٹھ مذکور ویران شده و روز بروز میشود ـ و درین جاے سیاجی زمین خرید کرد حویلی و باغ آخدور نموده است و نراین مذکور پیاده خود هانشا نیده است سندان بمهر قاضی و بدستخط زیندداران است منظور نمیکند ـ و مردم رستمجی شیوداس نامی

در باغ رفع شود - پیادہ مذکور آوردہ از درخت بستہ و ہشت پیادہ
ہا صود و صد شیتافل ( शीताफळ ) وغیرہ گرفتہ می برند و تمام باغ
خراب کرد - و در پیتھہ مذکور پانصد روپیہ پٹی بابتہ فوجداری می
برد و نہ گماشتہ جاگیردار نہ گماشتہ شیتہ دار اول بزبردستی نزو
مردمان پیتھہ مذکور تحصیل کردہ میگیرد - و حضور عبداللّٰہ
درین باب حکم والا بہ مہر وزارت پناہ دیہانت - خان بنام خان
عالشان فخرالدین خان صادر شود کہ فوجدار پٹّے و پیکا ادا بذمہ
نگیرد کہ باب ممنو عاست و درین بابت تاکید حضور پرنوراست
آمّااین کرم راہ و نیک کردار قبول نمی کند و می گوید کہ حقیقت
ما را پش دیوان و بحضور نویشتند - ضرور دانستہ لاچار شوند و این
صورت مجلس نویشتہ کہ مسلمان و ہندو مغل آن یک کردار دیدہ
و شنیدہ باشد مہر خود شاہدی خود برین کند - تحریر فی التاریخ
صادر قلمی شد +

भाषांतर

बादशाही

मोहर
मुनीर बिन
अबु तुरानी,
खादिम शरा शरीफ
सन ११०१

परगणे कडेवळीत सरकार अहमदनगर सुभा खुजिस्ता-बुनियादचे काजी व अहाली मवाली यांचे हुजूरांत हकीकत ता. १८ माहे जमादिल अव्वल सन ४३ जुलूस या कारणें कीं:-नारायण यास खानवालाशान यांनीं शत्रु म्हणून कैद केलें होतें. थोड्या दिवसांनीं तो खान साहेबांच्या कैदेंतून पळून गेला व पुन्हा कसबे मजकूर येथें आला. त्यानें महंमद युसूफची नोकरी स्वीकारली व तेथील फौजदार आणि शफदार झाला. नंतर अबदुल्ला जो दावलचा मुलगा आहे व ज्यास खान फरोज जंग यांनीं हद्दपार केलें होतें त्यास आपणाकडे मिळवून घेतलें. आतां तो राजरूपच्या गुमाश्ते यांना कुंभी वगैरेंचा वसूल गोळा करण्यांत अडथळा करतो. तसेंच तेथील जहागीरदार व शफदारांचा अंमल चालूं देत नाहीं. इतकेंच काय पण प्रत्येक

बाबतींत त्यांचा अंमल झुगारून देतो, व जेथें दीड हजार रुपयांचा वसूल असेल तेथें तीनशें चारशेंसुद्धां वसूल होत नाहीं. अशा प्रकारें हजारों रुपयांचें नुकसान होतें. पेठ आलमगीरपूर येथून दोन तीन हजार रुपये दरवर्षी आगाऊ वसूल होतात. यामुळें ही पेठ ओस पडत आहे व दिवसें-दिवस ओस झाली आहे. येथेंच सयाजी यांनीं जमीन खरेदी केली आहे व तेथें बाग व हवेली बांधली आहे. येथेंहीपण नारायण यानें आपलें पायदळ ठेवलें आहे. ज्या सनदा काजीच्या मोहरेच्या आहेत व ज्यांच्यावर जमीं-दारांच्या सह्या आहेत त्यांस हा मान्य करीत नाहीं. रुस्तुमजी यांचीं माणसें बागेंत असतात. त्यांना हे फरारी पायदळ झाडांशीं बांधून टाकतात व दहशती देऊन दोनदोनशें शिताफळें वगैरे तोडून नेतात व अशा रितीनें सर्व बाग नाश करतात. फौजदारीचा हक्क म्हणून पांचशें रुपये पट्टी पेठेंतील लोकांकडून वसूल केली आहे. तेथें न जाहगीरदारांचे गुमास्ते न शफदार पेठेंतून जबरदस्तीनें देखील सारा वसूल करूं शकत नाहीं. वजीरातीच्या मोहरेनीं हुजूर अबदुल्ला यांनीं हुकूम दिला कीं फौजदारांनीं पैका व पट्टी घेऊं नये. कारण ह्या बाबी सरकारांतून अमान्य आहेत, व या बाबतींत सरकारी ताकीदही आहे पण तो असल्या पवित्र व लोकोपयोगी हुकुमांनादेखील मानीत नाहीं, व म्हणतो कीं आमच्या हकीकती दिवाण व हुजूर यांचेकडे लिहाव्यात. शेवटीं हे लोक निरुपाय होतात व म्हणून ही हकीकत लिहिली आहे. जो कोणी मनुष्य मग तो हिंदू असो कीं मुसलमान असो हीं कामें पहात असेल अथवा ऐकत असेल त्यानें आपली साक्षी आणि मोहर येथें करावी. वरील तारखेस लिहिलें गेलें.

---

लेखांक ९१ वा ] [ ता. २१ जानेवारी सन १७००

بُرهان اللّٰه خان

... خان جیو ...

نقل مطابق أصل است

نقل پروانہ بمہر جمدۃالملک مدارالمہام از قرار بتاریخ نہم شہر رجب المرجب سنہ ۴۳ جلوس والا آنکہ گماشتہ فوجداران و جاگیرداران و دیسمکہان و دیشپانڈیان و مقدمان موضع ناندنج

پرگنه کره‌ولیت سرکار احمدنگر صوبه خجسته بنیاد بدانند که وکیل
تهور پناه رستم جی ظاهر کرد که پنجاه چاور زمین سوای مواز نه از
نیاز انعام خدمتانه سیتهه گری و مهاجن پیتهه عالمگیر پور موضع
مذکور بنام راجروپ ولد سیاجی مقرر است و از سر رشته دفتر
دکهن هم معلوم شد و بموجب سند امارت منزلت خانفروز جنگ
مسطور بدانند و این جا ... خریدی که سیاجی خرید کرده حویلی
و باغ دراین جا احدث نموده است ... بمهر قاضی و بدست خط
زمینداران بدست دارد چنانچه نقل آن ارسال درشته شود لهذا
هیچ کس مانع و مزاحم نشوده - درین باب تاکید اکید و قدغن
تمام دانند -

भाषांतर

बुऱ्हानुल्लाखान
खादीमशरा

हमीदतुलमुल्क मदारुलमहाम यांच्या मोहरेच्या हुकमाची नक्कल. ता. ९ माहे रज्जब सन ४३ जुलूस. मौजे नादनज परगणे कडेवाळित सरकार अहमदनगर सुभे खुजस्ता बुनियाद येथील फौजदारांचे गुमास्ते, जहागीरदार, देशमूख देशपांडे आणि मुकद्दम यांना कळावें कीं तहव्वुर पन्नाह ( वीरवर ) रुस्तुमजी यांच्या वकिलांनीं असें जाहीर केलें कीं पेठ आलमगीरपूर मौजे मजकूर येथील शेट व महाजनपण ाबद्दल पन्नास चाहूर जमीन राजरूप वल्द सयाजी यांच्या नांवें खिदमती इनाम आहे व याबद्दलचा उल्लेख दक्षिण देशाच्या सरकारी दफतरांतही मिळाला आहे. तसेंच इमारत मंजेलत खानफिरोज जंग यांची सनदही आहे. सयाजी राजे यांनीं तेथें जमीनदारांच्या सल्ल्यांनीं हवेली बांधली आहे व बाग केली आहे. म्हणून खानसाहेबांनीं सनदेवर आपली साक्ष ( शेरा ) लिहिली आहे. तरी या बाबतींत त्यांना कोणीही अडथळा करूं नये. या बाबतींत कडक ताकीद समजावी.

लेखांक ९२ वा ] [ ता. १ फेब्रुवारी १७००

خادم شرع شریف
مهر منیر ابو
تراب

شورت مجلس بحضور حمایت قاضی و حالی و موالی و خورد
و کلان قصبه ناندنج پرگنه کڑےولهت سرکار احمدنگر صوبه خجسته
بنیاد آنکه بتاریخ بیست و یکم شهر شعبان سنه ۴۳ جلوس غنیم
لئیم باسر دذدان شش هزار سوار بر قصبه مذکور آمده گماشته رفعت
پناه محمد یوسف فوجدار نراین نامی مهدا مقدم وغیره گفته فرستاد
که باقی کههڈی سال گذشته. و سال حال بفرستند نفرهی نام برد ها
جواب دادند که فردا آمدن باشید حالا نمی آیندو هم دو پیشتر راه
دیدند که کسی در پیش نمی آید - بوقت چهار گهڑی پانزده روز
بر پیتهه عالمگیر پور آمده تاخت نمودند و حمله کردند و قصبه را
گرفته و مردمان فوجدار وغیره همه کس گریخته بر قلعه رخته و بر
حویلی خانداد موروثی رستم ولد سیاجی نبیره پرسوجی بهونسله
آمده و درینجا دو گهڑی جنگ شمشیر و سنگ واقعع شد و هفت
زخم سنگ بر رستم جی رسیده و چهار پنج حردم ها را زخم سنگ و
شمشیر رسید - و شیوا نامی کشته و کومک آنها هیچ کس نه کرد و
حویلی مذکور را لوٹ کرد متاع مبلغ هشت هزار روپیه را گرفته
رخته و بروز دویم غنیم صبح زیورات گرخته فرستاد که آمده فرستاد
که آمده آنحال قلعه خواهیم گرخت - و بر آن جهان پناه خود ها

گووردهن و نراین و شیام و عبداللّه گماشته فوجدار شنبها برادر مقدم
و زمکو پٹواری قصبه و رایا پٹواری پیٹهه این همه مجبوراً حواله غنیم
نموده و سه هزار روپیه مقرر کرده و بروز سیوم غنیم مذکور بطرف قصبه
اشٹی رحته و هرکس که دیده و شنیده باشد بر و مهر شاهدی بگذارد +

بنده درگاه
رستم بن سیاجی

भाषांतर

मोहर मुनीर
अबू तुरानी
खादिम शरा

कैफियत हिमायत काजी यांचेकडे नादनज येथील अहाली[1] व मवाली व लहानथोर यांनीं सादर केली कीं तारीख २१ शाबान सन ४३ जुलूस रोजीं शत्रु सहा हजार चोरांच्या टोळीनिशीं कसबे मजकूर वर चालून आला आणि रफअत पनाह महमद युसूफ फौजदार यांच्या गुमास्त्याकडे व राजेश्री मुकद्दम यांचेकडे बोलणें केलें कीं चालू सालाची व गुदस्त सालची खंडणी द्यावी. ह्या लोकांनीं त्यावर उत्तर दिलें कीं उद्यां आम्ही येऊं. सध्यां येत नाहीं. त्यांनीं आमच्या मदतीस कोणीं येऊं नये अशी खबरदारी घेतली. चार घटका वेळ निघून गेल्यानंतर पंधरा सहस्र लोक आलमगीरपूर पेठवर चालून आले व त्यांनीं स्वारी केली. कसबा आपल्या ताब्यांत घेतला. फौजदारांचे लोक व इतर सर्व पळून किल्ल्यावर गेले व रुस्तुम वल्द सयाजी वल्द परसोजी भोंसले यांच्या पिढीजाद हवेलीचा आश्रय घेतला. येथें दोन घटकाभर घनघोर युद्ध झालें. रुस्तुमजी यांना दगडांच्या सात जखमा झाल्या आणि चारपांच लोक दगडानें व शस्त्रानें जखमी झाले, व शीवा या नांवाचा इसम ठार झाला. या लोकांना मदत कुणींच केली नाहीं. चोरांनीं हवेलीला गराडा दिला व ती लुटली. जवळ जवळ आठ हजार रुपयांचा ऐवज घेऊन गेले. दुसरे दिवशीं सकाळीं शत्रूनें डागिणे परतवून दिले व सांगितलें कीं आतां आम्ही येऊन किल्ला सर करणार आहोंत. यावर जहान पनाह, गोवर्धन, नारायण, शाम व अबदुल्ला फौजदाराचा गुमास्ता, शंभा मुकद्दमचा भाऊ, कसब्याचा कुळकर्णी रंगो, पेठेचा कुळकर्णी राया हे सर्व निरुपायानें शत्रूच्या स्वाधीन झाले व त्यांनीं तीन हजार रुपयांचा ठराव केला. नंतर तिसरे दिवशीं शत्रु कसबे अष्टीकडे रवाना झाले. ही हकिकत ज्यानें पाहिली व ऐकिली असेल त्यानें आपली साक्षी मोहर करावी.

| नीश्यानी राजरुप | रुस्तुम बिन सयाजी |
| --- | --- |
| ठ ——— ठ शेटे | बंदा दरगाह |

लेखांक ९३ वा ]  [ ता. ४ माहे डिसेंबर सन १७०७

خان والشان سلامت

التماس —
بنده دادخواه عاجز بیکس نامراد گم از حسن احمد خان گماشته عبدالرزاق مهاجن و جیرام گماشته راجروپ سیتهه و رعایا پیتهه عالمگیر پور قصبه ناندنج پرگنه کرے ولهت انکه

१ सर्वसामान्य लोक

بتاریخ چهارم رجب المرجب سنه ۴۴ سنگریا و بهلونت سرداران باشش هزار سوار قصبه و پیتهه عالمگیر پور را از عمله قصبه مسطور را محاصره نمود ـ دو روز مقام کرد و از درگاه روز سیوم مقدمان موضع مقهور را حالیه و عمله سیتهه را مانع ساخته ـ دریلوار دیوان تودرمل سیاجی نقد از زر از خزانه خود حالیه قصبه را نگاهداشته و پیتهه را تاراج کنا نیده و چند کسان اینجانب زخمی شده ویک سوار از فوج غنیم کشته او را اول منزل رسانیده و مرد مردمان پیتهه را نکرده ـ بناء بر آن بیخبر و نظربندی و فوجداری از تعدی طلب میکند رعایا پیتهه را تقسید ساخته و پروانه چیو بات بدست دارم سواران حیران و تهرن سیزده نفر را در قید نمود ـ بضرب سابق مفاتیح را طلب می کند ـ درین مایه هشت روز میگذاد که رعایا از جان خود بلب رسیده ـ قبل ازین سیتهه و محاجن اظهار ساخته که آن نها بحضور شهامت دعوانی

مرتبت خالصعزالله رفته دادخواه هم شد ـ درین باب مزاحم بیابد که اگر شمایان از آنجا گذاشته جای دیگر بروید تاهم این ابواب های نخواهم گذاشت ـ و مدت نه ماه که مردمعاش مسجد پیتهه را در ضبط خود آورده و موزن و خطیب زیاداست که نزدیک نمی آیند و بے چراغ شده مانده و بانگ و صلوة کسی نمی دهد و در تالاب برای جانوران آب کشی پیتهه که می رود او را گرفته جرمانه از و میگرند ـ در زمین باغ راجه سیاجی از زمینداران خرید کرده باغ تیار ساخته حالا در ضبط خود آورده و حاصل و محصول آنجا

خود میگیرد ـ و جاگیر و وطن یا مالیت و گاوان از غلّه در پیته می آید سری کا ویک تهکه می کرد و در هنگام و نایک بتونی فوت شده وزن او برای کار خود در جام کهتیر رخنه و جالی و مواتی انحای برای تحقیقات در پیتهه مذکور فرستاده او را ضامن گرفته درین جانگاهداشته و درین چند روز اینجا مانده و در طلب نمودن دیوان تودرمل از پنجا رفته جای خود گرفته نشسته است ـ حالا از ضامن های طلب می کند و شجر های رعایا میگیرد و ابواب ممنوعه در پیش دارد ـ امیدوارم که او را حضور طلبیده انصاف نمایند ـ و در ملک سیاجی که از روی پروانه مدد معاش بدست دارند درین زمین د، بیگه زمین یک جنگم برای آبادانی نگاهداشته بود او را تهمت حالیه بضرب سابق نموده بیست و پنجروپیه جرمانه گرفته ـ فقیر جای گذاشته گریخته رفته سنکه این جانب که بوای پیر کهن

بهمه و گاه که می آرد از کشیده میگیرد - و گاه و همه در پیتهه
آمدن نمی توانیست - حالا دریندجا از طرف خود کوتوال نشابیده
وهریک را گرخته ضرب سابق کرده میگذارد - و جاگیر از راجه روپ
همه خراب تاراج ساخته دزاجاره خود طلب می کند و جاگیردار
بعنایت همراه فوج خنفروز جنگ است و گماشته بهای دریندجا
ماضراند - الی تبال دولت تابان +

भाषांतर न. ७

खानवाला शान सलामत ( यांचे सेवेशीं )

अर्जः—

अर्जदार सेवक अहमदखान गुमास्ते अबदुल रजाक महाजन, जयराम गुमास्ते राजरूप शेटे, पेठ आलमगीरपूर कसबे नादनज परगणे कडेवलित येथील सर्व प्रजाः अर्ज कीं:—

तारीख ४ माहे रज्जब सनं ४४ रोजीं शंकऱ्या व हणवंत सरदार यांनीं सहा हजार स्वारांनिशीं आलमगीर पेठच्या व कजळ्याच्या भोंवतीं गराडा दिला. त्यांनीं दोन दिवस मुक्काम केला. तिसरे दिवशीं मौजे मजकूरच्या लोकांना कैद करून पेठेंतील सरकारी अधिकाऱ्यांना कैद केलें. गराडा घातला. दिवाण तोडरमल व सयामजी यांनीं पेठेची लूट केली. इकडील कांहीं लोक जखमी झाले व शत्रूचा एक स्वार मारला गेला. फौजदाराचा अधिकार जबरदस्तीनें हातांत घेतला आहे. पेठेंतील लोकांना कैद केलें आहे. येथील स्वार हैरान झाले आहेत व तेरा लोक कैद केले आहेत. पूर्वीच्या जरबेनें किल्ल्या मागत आहेत. अशा स्थितींत आठ दिवस गेले तर लोकांचे जिवाला धोका आहे. यापूर्वी शेट व महाजन यांनीं सांगितलें कीं मीं खानसाहेबांच्या सेवेंत जाऊन याची दाद मागावी. पण या बाबींतही ते आड आले व म्हणाले कीं जर तुम्ही ही जागा सोडून दुसऱ्या जागीं जाल तरी हें तुमच्या मागचें टळणार नाहीं. नऊ महिने झाले. पेठेंतील मशिदीचें उत्पन्न आपल्या ताब्यांत घेतलें आहे. तेथील मुवज्जन ( आजान देणारा ) व खुत्बा पढणारे मुळींच जवळ येऊं शकत नाहीं. व ती मशीद बेचिराख ( ओस ) पडली आहे. व तेथें कोणी नमाज पढत नाहीं. पेठेंतील जे कोणी लोक तलावावर जनावरांना पाणी पाजण्याकरितां जातात त्यांच्या पासून ते दंड घेतात. सयाजी राजांच्या जमिनींतील बागा जबरदस्तीनें ताब्यांत घेतल्या व त्यांचें सर्व उत्पन्न घेत आहेत. जागिरीचा वतनहक्क अथवा माल, धान्य जें कांहीं पेठेंत येतें त्याचा एकसारखा लिलाव करून टाकितात. विनायक तांबोळी वारला. त्याची बायको आपल्या कामाकरितां जामखेडींत गेली. तेथें पेठेंत आपले कांहीं लोक शोधाकरितां पाठविले. तिची जमानत घेतली व तिला

तेथेंच कैदेंत ठेवलें असेच कांहीं दिवस तेथें राहिले. नंतर ते लोक तोडरमलला बोलावण्याकरितां गेले व आपल्या जागीं राहिले. आतां आणखी जामीन मागत आहेत. लोकांचीं झाडें घेतलीं जातात व पुष्कळ अनिष्ट गोष्टी करितात. आम्हांस खात्री वाटते कीं हुजूर त्यास बोलावतील व शिक्षा करतील. सयाजी सारख्या जाहागीरदाराच्या जहागिरींत कीं ज्यांच्याजवळ जाहागिरींत दोन बिघे जमीन वस्तीकरितां एका जंगमानें घेतली होती त्याच्यावर तोहमत घेऊन व त्यास जरब देऊन पंचवीस रुपये दंड घेतला. येथील सर्व फकीर लोकतर पळूनच गेले आहेत. जर त्यांनीं येथें गवत आणिलें तर तें हिसकावून घेतलें जातें. म्हणून पेठेंत गवत वगैरे कांहींच येत नाहीं. आतां येथें आपल्या तर्फे त्यांनीं एक कोतवाल बसविला आहे व तो प्रत्येकास पूर्वीप्रमाणें मारठोक करीत असतो. राजरुप यांची सर्व जागीर लुटली गेली व तिचा वसूल ते घेत आहेत. येथील जहागीरदार खानफरोज जंग यांच्या समवेत आहेत व त्याचे गुमास्ते येथें हजर आहेत. ईश्वर सरकारचें राज्य अबाधित ठेवो.

---

लेखांक ९४ वा ] [ ता. ३ डिसेंबर सन १७०१

ملعم عرضداشت

بندہ ضمیر

بعد از تقدیم لوازم عبودیت و بندگی معروض میدانند کہ وکیل راجروپ و رستم بدرگاہ رفعت و جاہ‌والاخواہان شد کہ پدر موکلان در قصبہ ناندنیج سرکار احمدنگر صوبہ خجستہ بنیاد حسابی بوجہہ بودن متعلقان خود اخزان ساختہ دریلواز مہابت سنگہ و گووردھن گماشتہ‌ہای محمد یوسف جاگیردار آنجا آنرا در قبض خود آوردہ حکم جہانمطاع صادر شد کہ آن عمدۃالامرا عظیم‌الشان بکیفیت مرقومہ وا رساند - در صورت صدق وا نسودہ فیصل دہند و در ہرباب از پیشگاہ خلافت جہانبانے تاکید اکید دانند - سیزدہم رجب سنہ ۴۵ جلوس والا قلمی شد +

भाषांतर

अर्ज मुनीम

आपणास कळावें कीं राजरूप व रुस्तुम यांचे वकील दरबारांत आले व त्यांनीं विनंति केली कीं त्यांच्या अशिलाच्या वडिलानें कसबे नादगाव सरकार अहमदनगर सुभा खुजस्ता बुनियादचा हिशेब त्याच्या संबंधी लोकांना दिला नाहीं व तो त्यांनीं स्वतःच ठेवून घेतला आहे. शिवाय तेथील जहागीरदार महंमद युसूफ यांचे गुमास्ते महाबतसिंग व गोवर्धन यांना आपल्या ताब्यांत घेतलें आहे. म्हणून जहानमताब यांचा हुकूम आहे कीं आपण (उमदतुल ऊमरा अजीमुश्शान यांनीं) लिहिल्या हकीकतीची चौकशी करावी व खरें प्रकरण काय आहे त्याचा निकाल द्यावा. आणि असल्या प्रत्येक बाबींत सरकारच्या दरबारा तर्फे कडक ताकीद समजावी.

ता. १३ रजब सन ४५ जुलूस या दिवशीं लिहिलें गेलें.

---

लेखांक ९५ वा ] [ ता. १९ जानेवारी सन १८०३

نواب صاحب قبلہ سلمہ اللّٰہ تعالےٰ

عرضداشت راجروپ

بندگان فدوی

بذروہ عرض بخدمت بندگان نواب مستطاب معلے القاب فلک جناب خداوندی خدایگاھے صاحب ام میرساند کہ غریب پرور خدمت علایت نامہ گرامی بوقت نیک رسید بمطالع آن خُرّمی و فورسندگی حاصل گردید ـ درباب وکیل نوشتہ بودید کہ تا حال نرسید چنانچہ وکیل مسطور بخدمت شریف خواھد رسید اُمید کہ فوروخصمانہ نمودہ آنچہ وکیل اینجانب التماس نماید آنراسرانجام دادہ مراسرفراز نمایند ـ دیگر آنکہ کھیوجی بموجب حکم نوابصاحب بخدمت سرابرسعادت میرسید لہذا اُمیدوارم کہ بر احوال مشارالیہ نظرداد غور فرمودہ چنان نمایند کہ ترقّی موصی الیہ گردد ـ واجب بود بعرض رسانید ـ افتاب دولت تابان و در خشان باد ـ تحریر فی التاریخ دھم شھر شعبان المعظم سنہ ۴۶ جلوس والا +

भाषांतर

नवाबसाहेब किबला यांचें ईश्वर रक्षण करो

अर्जदार नम्र सेवक राजरूप

सरकार नवाब मुस्तताब मौला अलकाब फलक जनाब खुदावंदी खुदायताली यांचे सेवेशीं विनंति कीं आपलें कृपापत्र योग्य वेळीं पोंचलें. तें वाचून मन आनंदी व प्रसन्न झालें. आपण वकिला बद्दल लिहिलें कीं तो अद्याप आला नाहीं. तरी तो आपल्या सेवेंत हजर होईलच. विनंति कीं आमचे वकील आमचे कडून जी कांहीं विनंति करतील तिचा पूर्ण विचार करून त्या बद्दलचे हुकूम देत जावेत. दुसरें असें कीं नवाब साहेबांच्या आज्ञे प्रमाणें खेलोजीला सरकारच्या दरबारांत पाठविलें आहे. मला आशा आहे कीं त्याच्याकडे लक्ष देऊन त्याची बढती होत जाईल. योग्य होतें तें सेवेंत लिहिलें. आपल्या ऐश्वर्याचा सूर्य झळको. लिहिलें ता. १० माहे शाबान सन ४६ जुलूस.



लेखांक ९६ वा ] [ ता. २२ मे सन १७०३

نقل مطابق اصل است




نقل پروانه بمهر نواب عمدة الملک مدارالمهام اسدخان از قرار
بتاریخ ۱۶ م محرم الحرام سنه ۳۰ جلوس والا قلمی شد انکه امارت
و رفعت پناه و دارای نگاه دستگاه میر عبدالقادر محفوظ باشند -
مبلغ هشت و دو هزار از پرگنه دهار سرکار پنهالوازی صوبه براد
بابت ——— شنکراجی ولد مالوجی بضبط در آمده بجاگیر ناگوجی
ولد ——— دریدوار حسب الحکم والا حصبه اختر معاف
——— ترقیم یافته انوز رای باب یکماسه ——— که
فصلخریف بارش شد دام مسطور یکماسه شنکراجی وا گذارند
بتحصیل مالواجب بردارند -

مصدرہ ضمن از پرگنہ دہار سرکار پنھالوازی صوبہ برار نوکر جاگیر
شنکراجی ولد مالوجی مراسلہ خریف سبحان بیگ بخالصہ شریفہ
ضبط گشتہ بجاگیر ناگوجی ولد راماجی تنخواہ شدہ بود -
دریلوار بموجب

سیاسیہ دختر عمدۃ الملک رفع دارخان جاگیر مشار الیہ معاف حکن لہذا نوشتہ
میشود کہ انوارادای پناہ ناکوجی کہ محل مذکور را از خریف بارش
بتصرف مومی الیہ واگذارد -

شرح دستخط عمدۃ الملک

عمس صسا دام مدار السہام برقرار بعرض حکموالہ عمل می نمایند
شرح دستخط عمدۃ الملک شرح دستخط دارای پناہ گذشتہ
مدار السہام بر مچلکہ

شرح دستخط دارای پناہ

भाषांतर

बादशाहाचें कुशल असो:—

विनंति अर्ज:- अर्जदार महंमद वकील

कसबे मादनज परगणे कडेवळित येथील शेटे राजरूप व महाजन अबदुल रज्जाक यांचा बादशाहाच्या अधिकाऱ्यांचे सेवेशीं अर्ज कीं आम्हीं खान फरोज जंग यांच्या हद्दींतील आहोंत. शत्रूंनीं आमच्या पेठेची लूट करून बेचिराख करून टाकली आहे. व जें कांहीं खानसाहेबांनीं जाहीर केलें होतें, जे कांहीं कौल दिले होते व जेथें वस्तीस जागा दिल्या होत्या त्या सर्व नासधूस झाल्या. पूर्वीं धान्याची पांच वगैरे फुकट होत असे परंतु हल्लीं पेठेचे देशमूख व देशपांड्यांनीं गवत व कडबा देणें बंद केलें आहे व पांचशें रुपये घेतले आहेत. जे लोक धंदे करणारे आहेत, म्हणजे जे तेली, तांबोळी व सोनार आहेत त्यांचे जवळ शेती नाहीं त्यांनाच गवत अथवा कडबी देतात म्हणून आम्ही सरकारा जवळ विनंति करतों कीं आम्हांस आमच्या जीवित व वित्ताचें अभयदान द्यावें. योग्य होतें तें लिहीलें. सरकारचें ऐश्वर्य वाढो.

लेखांक ९७ वा ] [ सन तारीख नाहीं

هوالغنی

رفعت پناه شجاعت دستگاه سیاجی محفوظ باشند -
عرضداشتی که بجانب والائی سلطانی ارسال داشته بودند از نظر
فیض منظر گذشت - خطی که باینجانب نوشته بودند رسید -
مضمون بوضوع انجا میو چنان ایشان بضبت وربت کره ولیت مقرر -
انو نظم ونسق انجادانست شوارع را مقدم شناسنه و درتقدیم وظیفه
خدمت خود از قرار واقع کو شند - حسن خدمت را بهترین
نتیجه امان شناسم - فی التاریخ ۱۱ شهر

भाषांतर

सन × महिना ×

हुवलगनी ( ईश्वर कृपाळू आहे )

रफअत पनाह शुजाअत दस्तगाह ( वीर वर ) सयाजी यांचें कुशल असो. आपण आमच्याकडे जो अर्ज पाठविला होता तो नजरेखालून गेला. इकडे जें पत्र पाठविलें तें पावलें. त्यांतील मजकूर कीं कडेवलीतचा हक्क बहाल करावा. मान्य. तेथील व्यवस्था व बंदोबस्त योग्यपणें करावा आणि तेथील हकीकती अवश्य कळवाव्या आणि आपल्या वेतनापेक्षां आपली जबाबदारीची जाणीव अधिक बाळगण्याचा प्रयत्न करावा. कामगिरी उत्तम प्रकारें बजावल्यास त्याचा परिणाम उत्तम होईल असें समजावें. ता॥ ११ माहे

लेखांक ९८ वा ] [ सन तारीख नाहीं.

خانصاحب حلو شلسته الله تعالے

صاحب مهربان مشفق قدردان فیض بخش فیضرسان خانوالاشان —
بلند مکان —— سمولاه بر مسند و دولت متمکن بوده بر سرفسیر
خوبهان سایه ——

بعد از اشتیاق ملاقات بجهت ایاّم مشهوره رای انور فسیر
خیر اقبالست تا شیر گردانیده میشاید که احوال این حدود بخیر

و خیریت ذات و قابض الرعایت شب و روز مطلوب باسکان کہ موضع
بہانبورہ پرگنہ چمارکونڈی دہ وطن این جانب است و جاگیر سرکار
انفیاض زمان‌است چنانچہ کہ در آن زمان شنیدہ میشود کہ مالوجی
بہونسلہ جاگیر خود را کہ در پرگنہ دیگر است او را در سرکار داخل
نمودہ عیوضی جاگیر خود دہ مذکور را در جاگیر خود از ایندال
سیع المکان عرض نمود میکرد از انچہ کہ این مقدمہ براجرای است
اگر موضع مذکور در جاگیر مومیلی الیہ عوضی نمودہ خواهد داد دہ
مذکور ویران و خراب فواهد شد - از کہ در سرکار بموجب جمعبندی
جمع میشود بکدام وصول نخواهد شد و نخواهد یافت - این
حقیقت را در خاطر آوردہ جاگیر در سرکار همچنن کہ هست
نگاهدارند - کہ آبادانی زیادہ ترخواهد شد -

१ دیگری را نخواهد داد ―

२ ........................................

फाटकें

३ ........................................

४ ........................................

بحهد برخوردار را تہہ قدم خود طلبیدہ نگاهدارند - زیاد چہ -
انتاب دولت و اقبال تابان و درخشان باران در باب این مقدمہ
راجہ صاحب هم اند باید کہ بمہہ وجہہ ہر بانی تمام و کمال بزاید
خیرخواہ خواهد نمود - زیاد چہ عرض ماند +

भाषांतर

॥ श्री ॥

खानसाहेब ( सल्लेमतल्लाहूताला ) ईश्वर त्यांचें रक्षण करोः—

साहेब मेहेरबान मुशफिक कदरदान फैज बक्ष फैज रसान खानवालाशान बुलंद मकान

नेहमीं आपल्या हुद्द्यावर कायम असोत आणि नेहमीं राजाचे शुभचिंतक असोत. आपल्या भेटीची इच्छा प्रबळ आहे व आपल्या दर्शनाची व आपलें हुद्दत समजण्याची मार्गप्रतीक्षा करीत आहें. इकडील सरहद्दीची व्यवस्था उत्तम आहे. रात्रंदिवस ( ताब्यांत असलेल्या ) प्रांतावर देखरेख असते. मौजे भांबोरें परगणे चांभारगोंदी हा माझा वतनाचा गांव आहे आणि सरकार ( फैजुल जमान ) ची जहागीर आहे. हल्लीं असें ऐकण्यांत येतें कीं मालोजी भोंसले आपल्या जहागिरीचा गांव जो दुसऱ्या परगण्यांत आहे तो सरकारच्या

ताब्यांत देऊन त्याच्या बदला माझा गांव आपल्या जहागिरींत ( घेऊं इच्छितात ) असा अर्ज सरकारांत केल्याचें समजतें व या प्रकरणाचा विचार चालू आहे म्हणून कळवितों कीं जर वरील माझा गांव दुसऱ्या जहागिरींत दिला गेला तर तो गांव उजाड व नाश होईल. गांवाचा सारा जो जमाबंदी होऊन सरकारांत जमा होत असतो तो वसूल होऊं शकणार नाहीं. ही गोष्ट सरकारांनीं मनांत आणून माझी जहागीर सरकारनें जशीच्या तशी कायम ठेवावी. यायोगें वस्तीही अधिक वाढूं शकेल. दुसऱ्याकडून हें काम होणार नाहीं. ( या प्रकरणीं ) सरकारांनीं मला आपले जवळ बोलवावें. बाकी क्षेम. सरकारची कृपा निरंतर व वृद्धिंगत असो. कळावें.



लेखांक ९९ वा ] هوالباقی [ तारीख नाहीं

امارت و اقبال پناه رفعت اجلال دستگاه محب و ... اشعباه راجه خسر همواره ری صحت و عافیت بوده فو نیکنام مقصر اطرام باشند - و بر از و عافیت اقتضاف میشود - رای قود دار که دو کلم که دریکولا در جواب اُقیسر الاتحاد قلمی نسوده بودند رسید - چون بگر موحش از قضیه بامرض پرسوجی راجه که در شاهجهان آباد راهی داد و از دیگری خود مرقوم نسود بودند خاطر دوستدار نیز غایت متالم و متاثر شد - و کلفت و کدورت بسیار بخاطر راه یافت - افریننده که روح پاک را باخاک رابشه بخشید دلهای مصیبت زدگان راجروشکیب کرامت نرماید - اگر چه راه محبت که خاصه طبیعت انسانی است بی اختیار سرشته افطبار از دست میرود - لیکن از خواست الهی در آن چنین مصائب بجز راضی شدن بقضای فرمان چاره و گریزی نمی باشد و غیر از سبکی ری تدبیر نیست - می باید که متمسک وه الوثقی جمروسکوت گردیده بخیر و خیرات که نوشته اخرت آن جر ور تواند شد بپردازند و چنان جرع فرع بخود راه ندهند که همه کس را این شاه راه بقا نسید دنی و این قالب بے ثبات

گذاشتت - زیاد چه نویسد - اللہ تعالیٰ بر عمر شما بیفزاید و از فضل و کرم خویش صبر کرامت فرماید که صبر بهتر مرد را از هرچه هست - والدعا نوشته اقبال پناه سید محمد خان +

پروانه بمهر عمدة الملک وزیرخان از قرار بتاریخ هفتم شهر ربیع الثانی سنه ۶ از جلوس والا مطابق سنه ۱۰۷۴ هجری ——

भाषांतर

हुवलबाकी ( ईश्वर कृपाळू आहे )

इमारत व इकबाल पनाह, रफअत व जलाल दरगाह, मुजीब द्दारत पनाह, राजे साहेब नेहमीं कुशल व सुखरूप असोत व आपली कीर्ति स्वर्गांपर्यंत जावो व आपल्यास प्रति दिवशीं आरोग्य लाभो. आपण जें पत्र लिहिलें तें पावलें. जेव्हां राजे परसोजी शहाजहानाबादी येथें स्वर्गवासी झाल्याची दुःखद बातमी समजली तेव्हां फार दुःख झालें व आपणास झालेल्या दुःखाबद्दलही हळहळ वाटली. या बातमीमुळें आपल्या या मित्राच्या अंतःकरणास जबर धक्का बसला व मन उदास झालें. जगनिर्मित्यानें पवित्र आत्म्याचा संबंध मातीशीं जोडला आहे तो दुःखद व शोकग्रस्तांना धैर्य अर्पण करित असतो. प्रेमवश होणें हा एक प्रकृतिगुण आहे. मनुष्य असहाय होऊन धैर्यहीन बनतो तरी इच्छेनुसार असल्या संकटांच्या वेळीं ईश्वरी संकेतास शरण गेल्याशिवाय गत्यंतर रहात नसतें व समाधानाखेरीज मार्ग नसतो. तरी आपण संकटास धैर्यानें तोंड द्यावें आणि मृतात्म्याच्या शांतीकरितां दान-धर्म करण्याचा मार्ग स्वीकारणें आणि मुळींच शोकग्रस्त होऊं नये. कारण प्रत्येक माणसास हें अशाश्वत जग सोडण्याच्या मार्गानें जाणेंच आहे. या पेक्षां जास्त काय लिहावें. ईश्वर आपणास दीर्घायु करो आणि शांति व धैर्य देवो. कारण धैर्य हें माणसाजवळ मोठ्यांत मोठें साधन आहे.

इकबाल पनाह सय्यद महंमद खान यांनीं लिहिलें.

लेखांक १०० वा ] [ तारीख नाहीं

هو

میرزا قایم بیگ جیو

ملازمان ملازی معاری آمینگاهی مشفقی و مکرمی مرزای
معلی در حفظ ایزدی معالے بوده خوشوقت و در یادگاری دوستان
باشند - بعد از ادای مراسم نیازمندی که شود خیر خواهاں است انکہ
اینحدود خیراست و خیریت آن ملازمان از درگاه واجب و جوب لیل
و نهار مستدعی است - دیگر مبلغ دو صد روپیه را رقعہ عزیز و
فروز انگاهی خود بها نوشته داده و بنده را اطلاع شود که به چه سبب
قبول کرده آمده بود - اگر بروطن داری داده اند مضایقه نبود -
اگر بروقت و سبب خلافی خود داشته نقدی داده آید رغبت
لازم نبود که بدهند - اوازخانه خود میدادست دادا گماشته تفدار بود
وعبدالله که بود واضح است دریلولا برتقدیم نظر براشای و نام صرف ان
ملازم بود بدین موجب رغبت پیشی نموده دو صد روپیه از پیٹھه
عالمگیرپور باتّفاق انیجانب تبدل نموده مردم صاحب فرستاده و
کلکرنی غیر حاضر شده اونه ازین معنی عقیل کرد - انشاالله
در دو سه روز کلکرنی اورده که گرفته فرستاده خواهد شد - لیکن
بیشتر هم بهرباب خبردار باشند - و دیگر معامله این جااین ست
که سایر قصبه ناندیج و پیٹھه مذکور در جاگیر برادر نورداست و
این جا بواقعی موافق تنخواه عقیل نمیشود - و نصف از بوصول
نمیرسد ازین سوای عاملان فوجدار پیٹھه قدیم ویران کرده بازار نو
آبادمی کنند و باوجود عاملان رفعت اقبال پناه مرزا بوهان اله
چهاپه می کنند - آنگاهی خود می نمایند و از مهاجن این جانب
خرچه است چرا که او مهاجن است بنام برادر خورد سیوانه است -
امید که درجعه حق اشای که فیمابین است مهربانی می نموده
باشند - زیاده چه تصدیع دهند —

भाषांतर

मिर्जा कायमबेग मुलाजिमान मुलाजी आमीनगाही मुशफकी व मुकरमी मिर्जाई मुआला. मित्राचें शुभ असो :—

मित्रत्वाच्या लिखाणाच्या शिष्टाचारास अनुसरून लिहीत आहे की हा सेवक आपल्या कृपेचा आकांक्षी आहे. इकडील सर्वत्र कुशल आहे. आपले-कडील सर्वांचें कुशल ईश्वराजवळ मागत आहें. आपण दोनशें रुपये वसूल

करून पाठवावे असें लिहिलें परंतु ते कशा रीतीनें वसूल करावे हें कळविलें नाहीं. जर वतनांतून वसूल करावयाचे असले तर कांहींच हरकत नाहीं. परंतु जर ही रक्कम मी आपल्या पदरून द्यावी असें जर मागणें असेल तर तें ह्या सेवकास कबूल नाहीं. कारण ही रक्कम मी आपल्या पदरची देऊं शकत नाहीं. ह्या रकमेबद्दल रात्रंदिवस गुमास्ते तगादा करतील. तरी आपल्या उभयतांच्या मैत्रीकडे लक्ष देऊन ही रक्कम आलमगीर पेठेचे लोकांकडून त्यांची कबुली घेऊन वसूल केली जाणें बरें. कुळकर्णी दोन तीन दिवसांत येईल व पैसे वसूल करून देईल. आपण याबद्दल जास्त खबरदारी घ्यावी.

इकडील दुसरें एक प्रकरण असें आहे कीं कसबे नादनज व पेठ मजकूरच्या जकातीचें उत्पन्न माझ्या धाकट्या भावास जाहगीर आहे. मामूलप्रमाणें जकातीचा वसूल होत नाहीं. अर्धा वसूल झाला तर भाग्य. शिवाय फौजदाराचे लोकांनीं जुनी पेठ ओस पाडली असून दुसऱ्या ठिकाणीं बाजार भरवीत आहेत. शिवाय मिर्जा बुऱ्हाणुल्ला साहेब रफअत इकबाल सरकारचे अधिकारी येथें राहातात. ते लोकांकडून पैसे उकळतात व येथील महाजनांपासून पैसे मागतात. आपल्याशीं मैत्रीचें नातें असल्यामुळें आपणास कळविलें आहे. कृपा असावी. जास्त काय लिहिणें.

---

लेखांक १०१ वा ] [ तारीख नाहीं

•J•

راوجیو

خلت و موالات پناه جلادت و مخالصت دستگاه هموارہ

در حفظ ایزد مشحون بوده خوشوقت و سلامت باشند

بعد از اظهار اشتیاق ملاقات یکدیگر مفهوم رای بود و پیرای

باد خطی کہ مشتمل بر نگاشتن عریضہ خود بخدمت نوابصاحب

و قبلہ درباب وصول قرض فرستادہ بودند رسید کیفیت ابراز گردید

معبّا خط خود دراین مادہ بخدمت نوابصاحب قبلہ نوشتہ با آدم

برد انجانب بفرستند کہ بندہ درگاہ ہم درین معنی عریضہ بخدمت

قبلہ گاہی ادم رسل نماید - اغلب کہ درین صورت زر وصول خواہد

شد و رفعت دعوانی پناہ خواجہ بابا کہ از خدمت خانفروز جنگ

برای پیٹھ تہہ غیم لئیم رخصت شدہ - چون درین جا رسید

بندہ درگاہ اخون ابوالمحمد را ہمراہ خوبص مذکور فرستاد ـ چنانچہ
در موضع ساورگانوں عملہ پرگنہ میر یادہرماں پرکہوتجارہ لعک
درمیان انکہ و از دست اخوی مذکور زخم تیر دربار وی ماردی
ذہرماں مقہور رسید ـ اخرش مفسدان گریختہ رفتند و فتح نصیبت
اولیای دولت قاہرہ گردید زیادہ چہ نگارش تحریر شود ـ

آبر از = ظاہر ہونا to make known

**भाषांतर**

खुल्त व मवालात पनाह जलादत व मुखाकिसत दस्तगाह रावजी नेहमीं कुशल असोत.

एकमेकांच्या भेटीची इच्छा प्रगट करून ती सफल व्हावी अशी आशा करतों. आपलें पत्र व आपला कर्जवसूली बाबतचा अर्ज नवाबसाहेबांकडे पाठविण्यास दिला. पावले. मजकूर समजला. मी माझें पत्र या बाबतींत लिहून माणसाबरोबर नवाबसाहेबांकडे पाठविलें व लिहिलें कीं आम्ही आपले सेवक आहोंत. आपण या बाबतींत पत्र उलट पाठवावें. शक्य आहे कीं अशा रीतीनें पैसे वसूल होऊन जातील. खाजा ( रफअत दावानी पनाह ) कीं ज्यांना खानफरोज जंगचें काम दिलें गेलें आहे पेठ······कडे रवाना झाले. जेव्हां ते येथें आले होते तेव्हां मी माझा धाकटा भाऊ अबुलहमीद यास त्यांच्या बरोबर पाठविलें. अर्थात् मौजे सावरगांव परगणे ( नांवनाहीं ) येथील विऱ्या धर्माण व वाघू वंजार यांची मारामारी झाली. धर्माणच्या दंडास तिराची जखम झाली व शेवटीं मारामारी करणारे पळून गेले. जास्त काय लिहावें.



**लेखांक १०२ वा ]** **[ तारीख नाहीं**

صاحب و قبلہ سلامت

محمد خاں

از بندہ دیویداس بعد از آداب عبوہ سر نیاز مندی انکہ این
حدود خیر است و دیگر انکہ برای کری کرگ مرقوم نمودہ بودند
ملازمی سلامت پرسرام و کزک را در قید چبوترہ کوتوالی نگاہداشتہ
است ـ اُمید کہ یک نوشتہ محمد بیگ کوتوال بفریسند کہ
حوالہ بندہ نمایند ـ پیش ازین پرسرام و کزی کرک بخانہ حضرت

قاضی جیو میرفت و میگفت من راضی راجه جیو هیستم افرش
کلمات بدیوانی پیش محمد بیگ جیو ظاهر کرده هر دو کسان
را در نحد کرده اند - اُمید که یک نوشته مذکور بفرستد که......
بحوال بنده نساقد و قبض الوصول بمهر خود نوشته شود بفریسند +

و دیگر یکصد وسی روپیه مشارالیه می خواهند - بدست
هربهاو هندوی کرده بفرستد که خلوص شده بیایم - و شیرخان نامی
شخصی قرض دار عبداللّٰه خان مبلغ بیست و ۲۳ روپیه دعوی میکند
و تمام معامله بندهای این کرده ام عبداللّٰه خان را معمول کرده
بیست و ۲۳ روپیه بفریسند که از و خلاص شوم درین مدّت بزای
ناحق مانده ام از بنده عظمت آن بندگی انکه بوقت رخصت وقت
فرصت نیافت که رخصت شده آدم بوقت دو پهر شب رخصت
شدم و تهانه ادی و راهداری قصبه ناندیج بنام برهان اللّٰه خان مقرّر
شد اُمیدوارم که چند روز درجه من مرا و صاحب به بنده فرموده
اند - بوقت آمدن گرفته خواهم آورد - خاطر جمع فرمایش در
رای قابل بنده دیگری اجازت لازم است +

از جای دیویداس سک و کبرک را در قید کرده بوقت خلاصی
قریب ده روپیه جلع خواهد شد انرا سرانجام فرمایند +

भाषांतर

साहेब व किबला सलामत महंमदखान

सेवक देविदास याजकडून नम्रतापूर्वक कळविण्यांत येतें कीं इकडील सर्व कुशल आहे. करी कर्ग याच्याबद्दल लिहिलें तें समजलें. सरकारी नोकर परशराम आणि कर्ग यांना कोतवालींत कैदेंत ठेविलें आहे. विनंति कीं मिर्जा महमुद बेग कोतवाल यांनीं एक नाल पाठवावा व तो या सेवकाच्या स्वाधीन रहावा. यापूर्वीं परशराम आणि करी कर्ग काजी साहेबांच्या घरीं गेले होते व म्हणाले होते कीं, आम्ही राजेसाहेबाशीं राजी नाहीं. शेवटीं महमदबेग साहेब दिवाणी अधिकारी यांनीं त्यांच्या जबान्या घेतल्या व दोघांना कैदेंत ठेविलें आहे. विनंति कीं, एक नाल मिर्जा साहेबांकडे मला देण्याकरितां पाठवावा.

दुसरें असें कीं, एकशें तीस रुपये वरील इसमांना पाहिजे आहेत. हरीभाऊंच्या हस्तें हुंडी करून पाठवून द्यावी म्हणजे मी सुटून येऊं शकेन. आणि शेरखान इसम जो अबदुल्लाखानचा सावकार आहे तेवीस रुपयाची मागणी करतो आहे. अबदुल्लाखान यांना आपण तेवीस रुपये पाठवावेत म्हणजे माझी त्याच्या हातून सुटका होईल. मी निष्कारण शिक्षा भोगीत आहें. शिवाय आपल्या चरणीं नमस्कार. निघण्याच्या वेळीं सवड नव्हती सबब आपला निरोप न घेतां निघावें लागलें. रात्रीं दोन प्रहरींच निघालों. कसबे नादनजची ठाणेदारी व राहदारी ( रस्त्यावरची देखरेख ) वर बुन्हानुल्लाखान याची नेमणूक झाली आहे. मला आशा आहे कीं, थोड्याच दिवसांत माझी जागा आपण मला द्याल. आपण मला समक्ष सांगितलें त्याप्रमाणें करीन अशी खात्री ठेवावी.



लेखांक १०३ वा ] [ तारीख नाहीं

الله اکبر

رفعت و شهامت پناه جلادت و بسالت دستگاه پیوسته مشمول
عنایات شاهنشاهی باشند +

مکتوب اتحاد اسلوبی که در از فرط خصوصیت نوشته بودید
رسید و بر مضمون آن آگهی گردید بعض مقدمات که حوالہ......
فرستاد خود نموده بودید • برای معد میت انجا مید - چنانچہ
پیش ازین آن جلادت دستگاه گفته شده بود که پسر و برادر
خود جمعیت بسته شده رہ بفرستند نوکر بکار پادشاهی گرفته
خواهد شد حالاهم کس شما گذارش خواهد کرد - و در باب رجوع
کسان غیم لئیم नवाब मुसलेले مستطاب عالیجاه نشود ........
نمیتوان داد ——— पुसट ———————————
نوشته شود بعمل خواهند آورد - لایق آنکه نہ گذاره به تست دستور
ایشان حال خریان باشند بهتر چہ نگاشته آید - عراقب آور بخیر باد+

فرد = افراط abundance.

भाषांतर

अल्लाहो अकबर ( ईश्वर सर्वश्रेष्ठ आहे )

रफअत व शुजाअत पनाह जलालत व बसालत दस्तगाह यांच्यावर बादशाहीची नेहमीं कृपा आहे.

आपलें मित्रत्वाच्या भावनेचें पत्र पोंचलें. व मजकूर ध्यानांत आला. कांहीं प्रकरणें जीं आपण वरिष्ठांकडे पाठविलीं होतीं तीं निकालीं निघालीं. यापूर्वीं आपण कळविलें होतें कीं आपले चिरंजीव व बंधु सैन्यासुद्धां बादशाहाच्या मदतीकरितां रवाना करणार आहांत, तरी आतां सर्व माणसांसुद्धां त्यांना पाठवून देणें. नवाब मुस्तताब आलीजाह यांच्याकडून शत्रूच्या सैन्याच्या हालचालीं बद्दल कांहीं बातमी मिळत नाहीं, अथवा ते देऊं शकत नाहींत. ( अक्षरें पुसलीं गेलीं आहेत ) ... ... ... ... ... ... ... ... लिहिल्या प्रमाणें आपण करावें. बाकी ठीक आहे.



लेखांक १०४ वा ]

[ तारीख नाहीं

•J-

رفعت پناه جلادت و بسالت دستگاه پویسته محفوظ الهی باشند -
مکتوب تردداسکوب رسید و مضمون می بصت مشحون آن
موجب انبساط خاطر گردید - انشاءاللّٰه تعالی بمقتضای وقت
و قابولازم سعی در حق آن رفعت دستگاه بکار خواهد رفت - باید
که از خدمت بادشاهی سرگرم بوده دقیقه از دقایق [ फाटकें ] نگاهی
مهمل نگذارند - و پویسته بهمین دستور بارسال مکابت اختلاص
میانی [ फाटकें ] استحکام دهند - دو سبد کیله که از راه یگانگی
فرستاده رسیدند [ फाटकें نگاشته آید - فقط

भाषांतर

( आलिफ )

रफअत पनाह जलादत व बसालत दस्तगाह यांच्या वर ईश्वराची कृपा नेहमीं असो.

आपलें पत्र आलें तें पावलें. पत्रांतील मजकूर वाचून अतिशय आनंद झाला. आपल्या बद्दल योग्य तें ईश्वर कृपेंकरून योग्य संधि आणि योग्य

प्रसंग येतांच लिहून कळवीन. आपण मात्र बादशाही सेवेंत नेहमीं तत्पर असावें व त्यांत किंचित्‌ही दुर्लक्ष करूं नये. तसेंच याचप्रमाणें वारंवार पत्र पाठवून पत्रद्वारें मैत्री वृद्धिंगत करीत जावी. कळावें.

---

लेखांक १०५ वा ] [ तारीख नाहीं

هوالغانی

سبحان پناه خصوصیت و مولی درگاه بهتر بهاریداس،
حق سبحانه بعجهه کامیاب مطالب از جمیلد باشند

بعد از طی تکلیفات رسمی که شیم مخلصان است مشهود ضمیر تودید و برآنکه مدت تمادی بر آمده گهی حقیقت احوال را ارقام نفرمودند - باعث این خاطر دوستی متأثر شد نهایت عجیب آمد - توقع که از نگارش نامه خیریت شما به مادامور باشید - ملازم غریب الآثار خوالصه را بعد ایک استفسار ساخت که خدمت و کاری این جانب به خلف ایشان میان شیخ محمد فاضل جیو مقرر کرده اند از استماع این سنخهای خاطر را نهایت خود سندگی روداد + جای که همچو اخلاصی شود باری احتیاج دیگری نیست - مارا از بس که اظهار رابطه قدیم رخدید که انتظام مافیه صعاهی از نظر الاتحادات و زیاد - و از تنخواه جاگیر اینجانب اطلاع نفرمودند - عرض که جای اشان خواهید بود - احتیاج نگاشتن نیست یقین که درکارهای این موصوف دریغ نخواهیدداشت - زیاده چه نگاشته می شود -

भाषांतर

सुभान पनाह खुसुसियत दरगाह शेट बिहारीदासजी

[ ईश्वर कृपेनें आपणांस नेहमीं यश आणि लाभ प्राप्त होवो ]

मित्राचें क्षेम व कुशल इच्छिणें हे खरें कर्तव्य पुरें करून विनंति करतों कीं, बरेच दिवस झाले, आपलेकडचें वर्तमान समजलें नाहीं आणि

यामुळें मनाला खेद व आश्चर्य वाटलें. सबब आपण आपलें कुशल, पत्रद्वारें जरूर कळवीत जावें. मियां शेख महंमद फाजिलजी यांना इकडच्या बाजूस नोकरीवर नेमण्यांत आलें ही बातमी ऐकून फार आनंद झाला. जर आपण इतक्या कृपाळूपणें आपली मैत्री दाखवितां तर जास्त कांहीं लिहावयाचें राहतच नाहीं. असेच आपल्यामध्यें असलेले जुने मैत्रीचे संबंध वाढवीत जावेत. आपण आमच्या जहागिरीच्या तनख्याबद्दल कांहींच कळविलें नाहीं. जर हें काम आपलेंच आहे तर लिहिण्याची आवश्यकता राहत नाहीं. मला विश्वास आहे कीं, या प्रकरणीं आपण दुर्लक्ष करणार नाहीं. ज्यास्त काय लिहावें.



लेखांक १०६ वा ] [ तारीख नाहीं

دعوانی پناہ بسالت متعالی دستگاہ اعتقاد دوستان

مکتوب مرسل مضمون دلداری ویتھو پٹیل و رسید و باظہار و روابط اخلاص خاطر مسرور گشته - جواب ہمہ مقدمات بدنا مزدہا گفته شد ظاہر خواہید کرد خاطر خود بسہر و جوہ جمع باید داشت - موافق مدعاسب دلخواہ سرانجام خواہد یافت - زیادہ چہ تعلم آید -

भाषांतर

दावानी पनाह बसालत व मुताली दस्तगाह
विश्वासू मित्र

आपण पाठविलेलें पत्र पावलें व त्यांतील विठू पाटलाच्या थोरपणाचा मजकूर समजला. आपल्या स्नेहपणाच्या व मित्रत्वाच्या भावानें अंतःकरण मुदित झालें. आपण नियोजित केलेल्या माणसाजवळ सर्व प्रकरणांचीं उत्तरें दिलीं गेलीं आहेत, तीं आपणास विदित होवोत. आपण सर्वतोपरी विश्वास ठेवावा कीं, आपल्या हेतूप्रमाणें व मनाप्रमाणें सर्व गोष्टी पार पडतील जास्त काय लिहावें.



लेखांक १०७ वा ] [ तारीख नाहीं

رفعت و سبحانیت پناه عزّت و اقبال دستگاه محبان
ملازمی راجه جی حفظ حمایت بوده کامیاب و مقتضی
المطالب باشند

از شوق دریافتی که این ملاقات چه گوید قصّه نویسید که
بیرون از خیط تحریر بلکه زبان قلم و قلم زبان درخیریت معترف
بعجز و قصور است - لهذا اعیان دانید خامه را از آن مطلب
باز داشته فوض درمدعا میبرده که چون موضع مذکور معمول پرگنه
اسیر بجاگیر میدمزاده سپرده شد تنخواه که چنانچه پروانچه جاگیر
و پروانه باز گردانید که بنام ایشان از درباره آمده مضمون مشارالیه
یکد امی خدمت فرستاده اُمیدوار است که توجه دوستانه که
فیمابین مول است مرعی داشته موضع مذکور را جاگیر از خود
دانسته وجه محصول خریف هرکس که متصرف شده باشد بمشارالیه
بدهاند و من بعد مقدمان مزارعان موضع مذکور را قدعی نمایند که
به حواله دار موصی الیه برسانند و روز بروز چنین نوشته فرمایند که
آبادانی و معموری بیشتر از بیشتر نموده برفتی که تازمان دریافتی
ملاقات ابواب مکانیات که معزیز سلامت صحت مزاج و افر ازتیاج
باعث انبساط نشاط خاطر جانراست مندرج داشته مزید خلط
مشتاق داشته که دولتے امام عمر و دولت و داعي و حوائے در ترقي
لازم ملازم باد ـــ

भाषांतर

रफअत व सुभानियत पनाह इज्जत व इकबाल दस्तगाह मुहिब्बान मुलाजी राजाजी यांचा आश्रय असो व ईश्वर त्यांना यश देवो.

आपण प्रेमानें विचारणा केली कीं, या मित्राचें म्हणणें काय आहे. मी माझी कहाणी लिहीत आहें व मुखानें जे शब्द बोललों असतों तेच लेखणीनें लिहिले असते अथवा लिखाण हेंच प्रत्यक्ष बोलणें आहे. इकडील सर्व क्षेम व कुशल आहे. पण यांचा तपशील लिहिण्या ऐवजीं आपल्या मूळ मुद्याकडे लक्ष देऊं. जेव्हां मौजे मंगूर परगणे अशीरची जहागीर माझेकडे सोंपवली गेली तेव्हां तिच्या वेतनाचा हुकूम जो केला गेला असेल व जो

आपल्याकडे दरबारांतून आला असेल, त्यांत या सेवकास कोणती चाकरी दिली आहे याचा खुलासा करावा. आपल्यांत व आमच्यांत जें मैत्रीचें नातें आहे त्याकडे लक्ष देऊन मला आशा वाटते कीं, मौजे मजकूरची जाहागीर आपलीच समजून खरीफच्या हंगामाचा वसूल ज्यानें घेतला असेल त्याचे कडून मला देवविण्यांत यावा, व त्यानंतर वरील मौज्याच्या शेतकरी लोकांना ताकीद द्यावी कीं, तो वसूल परभारें या सेवकाकडे पाठवीत जावा. व तसेंच त्यांना लिहावें कीं शेती व वस्तीची वाढ अधिकाधिक होत जावी, आतांपर्यंत ज्याप्रमाणें आपण स्नेह ठेविला व ज्याप्रमाणें मला योग्यता दिली तसेंच चालू ठेवावें म्हणजे त्यायोगें मनाला आनंद होईल. माझी ईश्वराजवळ प्रार्थना कीं आपलें राज्य वृद्धि पावो व आपणास दीर्घायुष्य लाभो.



लेखांक १०८ वा ] [ तारीख नाहीं

رفعت پناه منعالی دستگاه ملازم میعادے سلامت

بعد از شرح اشتیاق دریافت ملاقات مشهود و راے یگانگیت برای یارے رقیمہ انولاد در باب قرض ذمہ نوابصاحب قبلہ مصحوب ہری پنڈیت یافتہ بود رسید چنانچہ درین ماه بخدمت نوابصاحب قبلہ عرض نموده گاہی میفرمایند کہ داخل میسازم گاہی میفرمایند کہ درین وقت زر موجود نیست درین صورت وصول زر معلوم درین وار نوابصاحب قبلہ تشریف برمبلوی میفرمایند اگر یک ادم عتمادی همراه نوابصاحب تا پانزده روز باشدا غالب کہ سبیل زر شود زیاده بخبر شوق چہ نگارشود –

مصحوب ( accompanied )

भाषांतर

रफअत पनाह मुताली दस्तगाह मुलाजिम मियादी
यांचे कुशल असो.

आपलें स्नेहभावयुक्त पत्र पावलें. नवाब साहब किबला यांचेकडे असलेल्या कर्जाबाबत आणि हरी पंडित यांचे बरोबर दिलेल्या पत्रांतील मजकूर समजला. आम्हीं नवाबसाहेब किबला यांचेकडे विनंति केली आहे. कांहीं वेळेस ते म्हणतात कीं, कर्जाची रक्कम देतों व कांहीं वेळेस म्हणतात

कीं, पैसे नाहींत. अशा परिस्थितींत पैसे कसे वसूल होणार हें उघडच आहे. तथापि लवकरच नवाबसाहेब किबला बरमपुरीस ( ब्रह्मपुरी ) येणार आहेत. जर आपण आपले भरवशाचे कोणी एक इसम नवाबसाहेबांच्या दिमतीस पंधरा दिवस ठेवूं शकाल तर संभव आहे कीं, पैसे वसूल होतील. यापेक्षां जास्त काय लिहावें.



लेखांक १०९ वा ] [ तारीख नाहीं

هوالغنی

اقبال و اخلاص پناه شوکت و جمیعت دستگاه ملازمیان
راجہ جی پیوستہ محفوظ حافظ جمعیتی بود یار آور
مخلصان باشند +

بعد از بندگی مراسم اشتیاق ملاقات گرامی کہ ما ہود المتعوداست دا‌ے سخندان براے نواز اقتضای میکنرده اند که از راه کمال تلطف و مہربانی میوہلذّت بخش شیرین موازی ده کوتہلئہ بیدانہ مرصول فرمودہ بودند درعین زمان بجہت اکبر مسندان یاخت اللّٰہ تعالیٰ خانہ ملازم آباد کردہ آباد و ہمیشہ دوستان شاہی را میوہ رسان دارد ـ زیادہ بخبر شوق بقای مبارک چہ نویسد ـ ہرکار و خدمتی که روی داد این جانب باشد اطّلاع فرمودہ باشد ـ زیادہ چہ نوشتہ آید ـ بخدمت ملازم شیخ عظمت اللّٰہ جیو از جانب مخلص بزرگ دعا و بصد اشتیاق مطالبہ باد ـــ

भाषांतर

हुवल गनी

इकबाल व इखलास पनाह शौकत व जमीअत दस्तगाह राजेसाहेब नेहमीं सैन्यानिशीं सुसज्ज असोत व मित्रांचे साहाय्यक असोत.

आपल्या दर्शनाची उत्कंठा तृप्त होऊन मनाला प्रसन्नता मिळेल व आपला योग्य सल्ला मिळेल अशी इच्छा ठेवून विनंती करतों कीं आपण कृपाळू-पणें व मेहेरबानीनें पाठविलेला गोड व चवदार मेवा ज्याला बेदाणा म्हणतात योग्य वेळीं पावला. ईश्वर आपलें घर नेहमीं आबाद राखो व बादशाही

मित्रांना गोड फळें देत राहो. यापेक्षां जास्त काय लिहावें. आपणास दीर्घायुष्य लाभो. आपणास जी कांहीं सेवा सांगावयाची असेल अथवा ज्या कांहीं प्रकरणीं लिहिणें असेल त्याची सूचना देत जावी. कळावें.

शेख अजमतुल्ला यांचे सेवेशीं या मित्राचा सलाम सांगणें.



**लेखांक ११० वा ]** **[ तारीख नाहीं**

صاحب و قبله مهربان خداوند خدایگان خانصاحب قبله

درکنف حمایت ایزد همچون بود سلامت باشید بعد از
ابلاغ دعوات واظهار اشتیاق که اهم مطلب است مشهودر رای انور
باد که احوالات مجازی اینصوب بعنایت الهی از خود دو بزرگ
مقرون بخیر است - و سلامتی ان ذات خجسته برکات مع جمیع
تو ابعان بالعشی والا نگارخواسته خواهانیم - ثانیاً انکه که خط
مصحوب آدم مرسوله فرستاده بودید رسید و حقیقت آن بموضوع
انجامید - از مردن عبدالله خان جیو نوشته بودید که غم والم دست
داد و از استماع آن خبر خیالی قصور وادا و قسمت الهی را چاره
ندارد - درین شربت فنا بهر کس چشیدنی است درین واقع
حامل صابر باشید - و حکم که برای فوجدار برخواسته بودید که
حکم بمهر نوابصاحب قبله مدظلّه گرفته بدست ادم مرسول
انصاحب فرستاده شد - یقین که بخدمت خواهد رسید - بالفعل
فوجدار پسر حاجی صدرشاه است و از امداون یکتام چونه خواست
بنمودند و چند بند کاغذ ایشان نیزاوهم فرستادیم - البتّه بخدمت
برسد - و خبروی پخبه نزد پتیلان ناندنیج باقیست - اگر بشیخ جیو
داده باشند قبلم وارد از و گرفته گاه و هم نریده کرده اینصوب
بفرستید - و اگر کسی بطرف بسته میرود از ماهر کس دعا و اسلام
خواهید نوشتت - زیاد بخبر شوق چه نگاشته آید +

بخدمت عنایتخان وغیرہ دعا بعر خواهید رسانید و مردم اندرون وغیرہ جمیع خورد دعا و اسلام خواهید رسانیدند جانب عبدالقادر جیو بمحمّد خان جیو بندگی نوشتہ

از جانب محمد مسی و سعداللّٰہ و فاطمہ دعا و اسلّام گوی بهر کدام برسد +

a perfume box = جونہ

भाषांतर

साहेब व किबला मेहेरबान खुदावंत खुदायगान खानसाहेब किबला. ईश्वरी कृपेंकरून आपलें कुशल असो. दुसरें असें कीं, आपण आपल्या माणसाबरोबर पाठविलेलें पत्र पावलें. त्यांतील मजकूर समजला. अबदुल्लाजी यांच्या मरणाबद्दल आपणांस अतिशय दुःख झाल्याचें लिहिलें तें समजलें. ही बातमी ऐकल्यावर माझा शोक अनावर झाला, परंतु काय करावें, ईश्वरी सत्तेपुढें उपाय नसतो. शिवाय मृत्यूचा घोट प्रत्येकास चाखणें आहेच. या बाबतींत आपण धैर्यानें तोंड द्यावें. आपण फौजदाराच्या हुकमाबद्दल लिहिलें कीं, तो नवाब साहेब किबला यांच्या मोहरेनिशीं आपल्या कडच्या माणसाबरोबर पाठवून द्यावा तर आपणास विश्वास असूं द्यावा कीं, तो आपल्या सेवेंत लवकरच येईल. सध्यां हाजी सदर शाहाचा मुलगा फौजदार आहे. आपण कांहीं चुना व कागदाचे बंद मागाविले ते पाठविले आहेत. अवश्य आपणास पावते होतील. नादनजच्या पाटलाकडून कांहीं कपाशी येणें आहे. जर त्यानें शेखजींकडे पाठविली नसेल तर ती त्याच्याकडून घेऊन व सर्व गवत खरेदी करून इकडे पाठवून देणें. बाकी क्षेम. सर्व मंडळीस सलाम सांगणें. यापेक्षां जास्त काय लिहावें हे विज्ञापना.

इनायतखान यांचे सेवेशीं सलाम. तसेंच सर्व लहान थोर मंडळींना दुआ व सलाम पावता करणें. अबदुल कादरचा महंमदखान यांना सलाम. महंमदमुसाचा सादुल्लाखान व फातेमा यांना दुआ व सलाम सांगणें.



भाषांतर

( अल्लाहु अकबर )

ईश्वर श्रेष्ठ आहे

[ रफअत व अवाली पनाह, तहव्वूर दुस्तगाह ] मोठेपणाचे खिताब कुशल असोत. अहमदनगरपासून त्या बाजूस रस्त्यांत शेंकडों चोर जे प्रवाश्यांची व प्रजेची लूट करितात व ज्यांचें पारिपत्य होणें योग्य आहे अशा लोकांच्या पारिपत्याची काळजी घेत आहोंत परंतु ते एकाएकीं मोठ्या जमावानिशीं येतात सबब त्यांना तंबी देतां येत नाहीं व त्या लोकांची थोडीसुद्धां खोड मोडूं शकत नाहीं असें इकडे आपण कळवीतही नाहीं तरी हें आपलें करणें योग्य नाहीं. कांकीं तिकडील प्रांताची सर्व सुरक्षितता आपल्यावर सोंपविली आहे. आपण असे कांहीं उपाय योजावेत कीं आपण विश्वासास पात्र ठराल. व आपली इज्जत कायम राहील. या पेक्षां ज्यास्त काय लिहावें.

रफअत पनाह ( श्रेष्ठ आधार )

बजाजी नाईक व मेहदाजी नाईक यांना पत्रें पाठविलीं आहेत. या करितां कीं तीं त्यांनीं लवकर वरील इसमाकडे पाठवावींत व तीं हस्तगत करण्यांत दिरंगाई न व्हावी.

---

लेखांक १३९ वा ] [ तारीख नाहीं

الله اكبر

شجاعت و تہور پناہ جلادت و بسالت پیشگاہ و مودی انشباہ
راج جیجو ہموارہ مشمول عواطف بود خوشوقتی باشند +

بعد ہذا بر ضمن خلعت پزیر مشہور گردانیدہ می آید -
مکتوبی مرسولہ رسید - و مضمون مفہوم شد - آنچہ از مذکوران
تردد خود و امتیاز شدن غنیم لیئم در ملک و در استمداد نوشتہ
بودند مفصل و مشرحاً بموضوع انجامید درایندوار خبر رسیدہ کہ
جمعیت غنیم بطرف کوہ و قادر آباد آمدہ است آن تہور پیشگاہ
را باید کہ درباب کومک خدمت نواب مشتطاب معلی القاب
مہابتخانجیو کہ باعسا کرمضورہ قریب جوارند بنویسند کہ کومک
شما اینجانب وابستہ بتوجہہ نواب جیجو است - ہمین کہ مدد
بکنید کہ باتفاق یکدیگر مفصدان را تنبیہ واقعی نمودہ آید - زاید
چہ نوشتہ آید - فقط

भाषांतर

अल्लाहु अकबर

( ईश्वर सर्वश्रेष्ठ आहे )

शुजाअत व तहव्वूर पनाह, जलादत व बसालत पेशगाह व मुदी इनतबाह ( किताब ) राजे जयजू ज्यांच्यावर नेहमीं कृपादृष्टि आहे त्यांचें कुशल असोः—

सरकारी पोशाक देऊन कळविण्यांत येतें कीं तुम्हीं पाठविलेलें पत्र पोंचलें. मजकूर समजला. आपण वरील प्रकरणीं ज्या कांहीं तजविजी केल्या आणि देशांतील शत्रु वगैरे यांच्या विषयीं जी माहिती खुलासेवार कळविली ती आम्हांस समजली. असें कळतें कीं, शत्रूचें एक सैन्य कादराबादच्या डोंगरामार्गें येत आहे तरी आपण नवाब महाबतखानजी जे आपल्या सैन्यानिशीं जवळच्याच प्रांतांत आहेत त्यांना आमच्या मदतीकरितां कळवावें उभयतांचें सैन्य एकत्र करून बंडखोरांना चांगली तंबी देण्यांत येईल. यापेक्षां जास्त काय लिहावें.



[ लेखांक १४० वा ] [ तारीख नाहीं

अस्पष्ट शिक्का

زبدةالاقران نیماجی سندیہ محفوظ باشند -

پوشیده نماند که چون جمعیت او را تہور و رفعت پناه سیاجی فوجدار اشتی بعرض نواب خطاب معلی القاب عمدةالملک رکن‌السلطنت العظمے عضد الخلافت الکری رسایند که آن جوان کار آمدنی و شاه نفس است ازاد شده کے دارد حسب‌الحکم بندگان نواب صدر یگانے قلمی میگردد که بمجرد رسیدن نوشتہ بجمعیت خاطر خود ہر قدر جوانان خویش باشد که ہمراه داشته و شده پیش روانہ حضور شود - موافق شرح ملک غیر نوکر نموده همراه شده — نوشتہ از قول بہ راستی در — نام خود رسانیم درامدن خود اہمال و توقف نورزند بیست و یکم ربیع الثانی سنه ۱۰ تحریر است -

भाषांतर

जुबदतुल अफजॉन नेमाजी शिंदे कुशल असोत.

कळावें कीं ज्याअर्थी जमीअतुल अदा व रफअत पनाह सयाजी फौजदार अष्टी यांनीं सरकारांत विनंति केली कीं हे सरदार उपयोगी पडणारे असून शूर आहेत म्हणून खास सरकारकडून कळविलें जातें कीं हें पत्र पावतांच आपल्या योग्यतेप्रमाणें जितके शिपाई असतील त्यांना बरोबर घेऊन सरकारांत हजर व्हावें.

---

लेखांक १४१ वा ] [ तारीख नाहीं

الله اکبر

رفعت پناه تهور دستگاه جلادت اکتساه سپاهی مشمول عنانات اعلحضرت خاقان خدیو کنان باشند محضر مسطور نمابا و مکتوبی که دریتوار مشتمل بحقایق حالات خویش و معین ساختن نواب عمدة‌الملک رکیب‌السلطنة مهابتخانجیو بخدمت فوجداری کره‌ولیت و اشتی جامکهیره وغیره بضسلع نگاشته بردید رسید - بسوانحات آگهی دست داد چون نواب عمدة‌الملک قدردان اند در خورد کارطبی و خدمتگذاری آن تهور و پیشگاه متوجهم و ملتفت احوال ایشان خواهند بود - خاطر خود بمهم ابواب جمع دارند و پیوسته هم منوال حقایق می نویسان باشند زیاده چه نوشته آید - فقط

भाषांतर

अल्लाहु अकबर

( ईश्वर सर्वश्रेष्ठ आहे )

रफअत पनाह तहव्वूर दस्तगाह जलादत एकतेसाह सिपाही ( किताब ) यांच्यावर आला हजरत खाकान यांची कृपा असो.

आपण आपल्या पत्रांत लिहिलेली हकीकत समजली. व नवाब उमदतुल-मुल्क रकीबुल सलतनत महाबतखानजी यांना कहेवाळित, अष्टी व जामखेड वगैरे परगण्यांचे फौजदार नेमल्याबद्दल आपण लिहिलें होतें तें समजलें. नवाब उमदतुलमुल्क कळकळ बाळगणारे आहेत त्या अर्थी त्यांना हकीकती कळविणें व लहान बारीक कामांत व सरकारी कामें पार पाडण्यांत आपण त्यांचें लक्ष वेधीत जावें. आपलें सर्व लक्ष सर्व बाबींत असूं द्यावें. व नेहमीं सर्व प्रकारचें वर्तमान पत्रद्वारें कळवीत जावें. यापेक्षां जास्त काय लिहावें.

लेखांक १४२ वा ] [ तारीख नाहीं

هوالغنی

رفعت و جلادت پناه تهور و بسالت انتباه سیاجی بهم محفوظ
الطاف سری جیجو باشند

بعد طی رسمیان اخلاص مخلص بضمن خلعت پزیر واضح
باید که چون مابین از قدیم رابطه اختصاص و مختص است بایدی
انکه رمقی بغریر عی نگذاشته مکتوبات بهجت افزا خورسند می
نموده باشید و این معنی را باعث مزید مسرّات و استحکام مافی
موانسات داشته و یکدیگر از هیچ چیزی هم کاند یه هدیور وکهار
نخود هرقدر که بهم رسد بخرید درکار است

مخلص نگاری قلمی شد که هیچ چیزی مذکور و کهار نخود
هرچند که بیش از بیش باشد بسیار خوب است و نهایت
اضامندی دانده

نخود = چنے
کہار = سوکھی گھاس

भाषांतर

हुवलगनी

( ईश्वर सर्वश्रेष्ठ आहे )

रफअतो जलावत पनाह तहव्वूर बसालत इंतबाह सयाजी यांचें सर्व कुशल असो ' श्री जयजू ' यांचें कुशल असो.

मित्रत्वाच्या नात्यानें पाठविलेल्या पत्राचा आणि सरकारी पोशाकाचा स्वीकार करावा, व कळावें कीं आपणांमध्यें पूर्वापार मैत्रीचें नातें असल्यामुळें किंचित् ही मनें कलुषित नसावींत. आणि वारंवार एकमेकांनीं पत्रें पाठवीत जावींत म्हणजे आनंद होत जाईल व परस्पर प्रेम वाढेल. ... ... ... ... कांहींही पैकीं ... ... ... वाळलें गवत व हरभरे जितके कांहीं मिळूं शकतील तितके अवश्य पाठवावे.

[ पुढचा मजकूर फाटला आहे ] ... ... ... ...

स्वतः सरकारकडून कळवण्यांत आलें कीं गवत, हरभरे पैकीं जें कांहीं व जितकें जास्त मिळेल तितकें मिळवावें व याबद्दल तुमच्यावर विशेष कृपा होईल.

लेखांक १४३ वा ] [ तारीख नाहीं

آماجی ولد جیت جی سلطان‌خان ولد حبیب خان مهپت ولد نرهر
اسپ ماهروی اسپ در پشانی سفید اسپ سمند ...
مانفردار نفر راجپوت چکله دار نفر شیخزاده ... ... ... ...

... ولد راماجی دریاخان ولد حبیب خان
اسپ ترمک ام داری اسپ نیله نور پنجاب نما ... ...
باری کلان نفر راجپوت داربادی نفر شیخزاده

ناروجی ولد لوکوجی راهوجی ولد کانهوجی ... ...
اسپ اسپ نیله کبشود میان‌زنگ سفید ... ...
باری‌دار نفر راجپوت نفر راجپوت

محبّت‌خان ولدالوخان باندو ولد شیخ داول مورو ولد ایساجی
اسپ سفید پنجاب اسپ جانب ماهروی اسپ ... ...
سر بالا دامان سفید
نفر شیخزاده باری گران نفر شیخزاده ... ...

ناروجی ولد دنّاجی اُدهوجی ولد ایساجی رگهوناتهه ولد هری
اسپ طرق اسپ نیله جانب دوم داغ اسپ‌نیله شریک خال نما
بارگر نفر راجپوت بارگیر نفر راجپوت باری‌دار نفر راجپوت

شیخ ملک ولد شهبازخان یتهوجی ولد نیلوجی دماجی ولد راجوجی
اسپ طره ترابی سفید اسپ سفید اسپ طره دارد راج
داربادی نفر راجپوت باری‌دار نفر راجپوت باری‌دار نفر راجپوت

نیساجی ولد راماجی حسن‌الدین شاه علی نرسوجی ولد ویتو
اسپ سیاه پر چهار اسپ الی ابر سرنسب اسپ مادیم ... ...
پای سفید بالادارد
باری‌دار نفر راجپوت نفر شیخزاده بارگیر نفر راجپوت

بادشاه عالمگیر
علی بیگ بنده
۱۰۸۲

भाषांतर

| | | |
|---|---|---|
| उमाजी वल्द जयतजी | सुलतानखान वल्द हबीबखान | महपत वल्द नरहर |
| घोडा माहरूई | घोडा कपाळावर पांढरें | घोडा ... ... |
| १०० माणसें रजपूत लोक | चकलादार शेखजादा लोक | ... ... |
| ... वल्द रामाजी | दर्याखान वल्द हबीबखान | ... |
| घोडा त्रिमकदारी | घोडा पिंवळा | ... |
| बारी मोठी रजपूत लोक | दारबारी शेख जादा माणसें | |
| नारोजी वल्द लोकोजी | राहूजी वल्द कान्होजी | |
| घोडा | पिंवळा घोडा मध्यें पांढरा | ... ... ... |
| बारीदार रजपूत लोक | रजपूत लोक | |
| मुहब्बतखान वल्द आलूखान | बांडू वल्द शेख दावल | मोत वल्द येसाजी |
| घोडा पांढरा डोक्यावर पांढरें | घोडा | घोडा ... ... |
| शेखजादा लोक | बारी मोठी शेखजादा | ... ... ... |
| नारोजी वल्द दत्ताजी | उधोजी वल्द येसाजी | रघुनाथ वल्द हरी |
| घोडा | घोडा पिंवळा बेंपटीवर डाग | पिंवळा घोडा |
| बारगर रजपूत लोक | बारगर रजपूत लोक | बारीदार रजपूत लोक |
| शेख मलिक वल्द शाहबाजखान | विठूजी वल्द निळूजी | दमाजी वल्द राजूजी |
| घोडा तुरेदार पांढरा | घोडा पांढरा | घोडा मोठा तुरेदार |
| बारीदार रजपूत | बारीदार रजपूत लोक | बारीदार रजपूत लोक |
| नेमाजी वल्द रामाजी | हुसनुद्दीन वल्द शाहअली | नरसोजी वल्द वेणू |
| काळा घोडा चारी पाय पांढरे | घोडा डोक्यावर ... | घोडा मादी |
| बारीदार रजपूत लोक | शेखजादा लोक | बारगीर रजपूत लोक |

अलीबेग बंदा
बादशहा आलमगीर
१०८२

लेखांक १४४ वा ] [ तारीख नाहीं

نائب راجروپ ولد سیاجی








حیات ولد محمد امین ابن عثمان قوم افغان ساکن مزورآباد رنگ گندم فراخ پیشانی ... ... ... ... ... ریش بروت حال چهار می خورده ... ... ... ... ...

سیادت دارای پناه وزارت و معانی دستگاه فرزند سعادتمند بجان پیوند میر علی تقی در حفظ و سلامت متعال بوند مقفی اهرام باشند -

مبلغ ۳ لک و چهار هزار دام از پرگنه کرےولیت سرکار احمدنگر صوبه خجسته بنیاد بجاگیر شریف من ابتدای مال و سایر مقرر است - دریفواد وکیل مشارالیه ظاهر کرد که محمد یوسف جاگیردار قصبه ناندنیج از راه ———

[ पुढचा मजकूर नाहीं, कागद फाटला आहे ]

نائبان راجروپ ولد سیاجی








شنکراجی ابن شیواجی قوم مرهته ساکن دولت آباد گندم رنگ فراخ پیشانی - ریش و بروت سفید داغ چیچک برمه ی

ب ———

دادجی ولد مالجی
اسپ طرق
مرهته

کهندو ولد ترماجی
اسپ شریک سرازمایگی تاریک
باری گان
مرهته

۱۳ جمادی‌الثانی سنہ ۳۰
سنبھاجی ولد ستواجی
اسپ شریک
باری خورد مرھتہ

نفران اسپان
بھرجی ولد بھیمجی
اسپ
مرھتہ

---

۱۳ رمضان سنہ ۳۱
نیجاجی ولد راماجی
اسپ ماکہ کہود سفید نما
باری کلان مرھتہ

نفران
اسپان
ایساجی ولد سیواجی
اسپ फाटके
باری کلان مرھتہ

---

۱۳ رجب سنہ ۳۰
ابو محمو ولد شیخ مالو
اسپ ماکہ برطرف
باری کلان تحت

داموراو ولد راماجی
اسپ ماکہ کہود ھکسے
باری خورد مرھتہ

عوض جانوجی ولد مالوجی فراری

دانوجی ولد مدکاجی
اسپ ماکہ شریک
باری خورد مرھتہ

بادشاہ عالمگیر
محمد باقرالحسینی
مہر نیابت بندہ

---

۱۲ رمضان سنہ ۳۱
باسم محمدجی ولد کہنڈوجی
اسپ ماکہ بہ طرف تصبہ
باری کلان مرھتہ

نقل
صحیح است

عوض سیاجی ولد ایساجی فراری

نقل
صحیح است

تحریر فی التاریخ ۱۸ سوال سنہ ...

भाषांतर राजरूप वल्द सयाजी यांचे नायब










हयात वल्द महंमद अमीन मुलगा उस्मान जात अफगाण राहणार मजबराबाद तांबूस रंग कपाळ पसरट ............................ दाढी मिशी लहान ..........................................

मीर अली तकी खान, सियादत दाराये पनाह, विजारत व मानी दस्तगाह फर्जंद रशादतमंद यांचें नेहमीं कुशल असो.

तीन लक्ष चार हजार दाम परगणे कडेवळित सरकार अहमदनगर सुभा खुजस्ते बुनियाद पैकीं आपल्या जाहागिरींत तेथील उत्पन्नासुद्धां नेमलें आहे. या बाबतींत आपल्या वकिलांनीं जाहीर केलें कीं कसबे नादनज येथील जहागीरदार महंमद युसूफ ............................

[ पुढील मजकूर नाहीं, कागद फाटका आहे ]

राजरूप वल्द सयाजी यांचे नायब










शिवाजीचा मुलगा शंकराजी जात मराठा राहणार दौलताबाद गोरा रंग पसरट कपाळ मिश्या व दाढी काळी, तोंडावर देवीचे कांहीं वण.

दादजी वल्द माळजी
घोडा तुर्क
मराठा

खंडू वल्द तिरमाजी
घोडा
बारी मोठी मराठा

१६ जमादिउल सानी सन ३०

संभाजी वल्द सरवाजी
घोडा
लहान बारी मराठा

माणसें घोडे
भरजी वल्द भीमजी
घोडा मराठा

१६ रमजान सन ३१
नेजाजी वल्द रामाजी
घोडे खोद पांढरे
२००
बारी मोठी मराठे

माणसें घोडे
येमाजी वल्द शिवाजी
घोडा ...
बारी मोठी मराठे

१२ रजब सन ३०
अबूमहंमद वल्द शेख मालू
घोडे शरीक
२००
बारी मोठी

दामुराव वल्द नारोजी
घोडे
२००
बारी लहान मराठे

रानोजी वल्द मदकाजी
घोडे शरीक
२००
बारी लहान मराठे

जानोजी वल्द मालोजी फरार यांच्या ऐवजीं

१२ रमजान सन ३१
महदजी वल्द खंडूजी
घोडे कसबे कडे
२००
बारी मोठी मराठे
सयाजी वल्द येमाजी फरारीच्या ऐवजीं

मोहर नायबी
महंमद बाकर अल
हुसेनी बंदा
बादशाह आलमगीर

नकल बरोबर
आहे

नकल बरोबर
आहे

तारीख १८ शव्वाल सन ... ...

लेखांक १४५ वा ] [ तारीख नाहीं

سرداجی ولد پونجاجی بھیکاجی ولد نیماجی
جانوجی ولد باجی سنبھاجی ولد ایساجی
للعہ دای ص، تھان ۳۵

---

اسپان للعہ دای واقعہ ۷ جمادی الثانی سنہ ۳۰
صہ تھان

۷ جمادی الثانی سنہ ۳۰ ۳ جمادالثانی سنہ ۳۰ خود
ارسال ارسال شراکت ما اسپ
کھولیے بزمہ خرچ طرق ملکی طرق ایرہ محمد راج
باری کلان باری کلان بنظردارد ابرہ بانات
شناخت

---

نایبان ۳۵

---

تصیحہ رسید ۳۱
۳۰
ادم داست ادم فقط
अरबी आंकडे आहेत نفر

---

۷ جمای الثانی سنہ ۳۰ ۸ نفر
۸ دای

---

میان نور محمد ولد سید جلال الدین سیف ولد حیات
اسپ شریک پتیل اسپ ملکی ارتکاب طرقیما
باری کلان سادات باری کلان افغان

---

داول ولد سید عبداللہ سایاجی ولد ... ...
اسپ سفید سادات اسپ ماکہ طرق نیلہ داری
باری خورد مرہٹہ

---

اسپ ماکہ مذکور گمس اغاز رادھو مہیت راؤ
باری خورد تحر بصہ اسپ نیلہ کھود جای نچتہ خط شد
پرھے مرہٹہ

भाषांतर

सरदाजी वल्द पुंजाजी
जानोजी वल्द बाजी
४ राय

भिकाजी वल्द नेमाजी
संभाजी वल्द येमाजी
५ ठाण ३५

---

घोडे ४ राय
७ जमादिउलसानी सन ३०
पोंच
तुर्क
बारी मोठी

तारीख ७ जमादिउलसानी सन ३०
३ जमादिउलसानी ५ ठाण
सन ३० स्वतः
मुश्की तुर्क सरकत १०० घोडे
बारी मोठी अभ्रा बनात
ओळख

---

नायब ३५

---

तपासणी झाली ३१
३०
फक्त माणसें
माणसें ३०
३०

---

७ जमादिलसानी सन ३०

८ माणसें
८ राय

---

मियां नूरमहंमद वल्द सय्यद जमालुद्दीन
घोडा
बारी मोठी सादात ( सय्यद लोक )

सैफ वल्द हयात
घोडा देशी
बारी मोठी अफगाण

---

दावल वल्द सय्यद अब्दुल्ला
घोडा पांढरा सय्यद

सायाजी वल्द ... ... ...
घोडे तुर्क बारी लहान
२०० मराठे

---

घोडे
१००
लहान बारी शेखजादा

राघो महिपतराव
घोडा पिंवळा
मराठे



# श्रीमंत शिवाजीराव राजे भोसले भांबोरकर

## ( हे प्रस्तुत धार संस्थानांत नोकर आहेत )

## यांचे संग्रहांतील ऐतिहासिक लेख

श्री. भिकाजी राजे भोंसले यांच्या फारशी कागदांच्या छपाईचें काम सुरू असतां त्यांचे भाऊबंद श्री. शिवाजीराव शंकरराव धुळयास त्यांच्या एका मेहुण्याच्या लग्नसमारंभाकरितां सन १९४२ च्या जून महिन्यांत आले होते. ते वेळीं त्यांची आमची भेट होऊन आम्ही त्यांचे संग्रहांतील लेख छापण्याकरितां देण्याविषयीं त्यांस विनंति केली. त्यानंतर शाहूछत्रपतींच्या कारकीर्दीपासून पेशवाईच्या अखेरच्या काळापावेतोंचे त्यांच्या संग्रहीं असलेले मराठी ऐतिहासिक लेख त्यांनीं मंडळाकडे पोस्टानें रवाना केले. या लेखांच्या अस्सलबरहुकूम नकला करून घेऊन ते लेख त्यांचेकडे परत पाठविण्यांत आले. श्री. शिवाजीराव राजे भोंसले यांच्या संग्रहीं कांहीं फारशी लेख आहेत असें श्री. भिकाजी राजे यांचें म्हणणें आहे व त्यांच्या निवेदनांत त्यांनीं ते लेख मंडळाकडे प्रसिद्ध करण्याकरितां द्यावे अशी त्यांस विनंतिही केली आहे. या विनंतीअन्वयें पुढेंमागें ते लेख त्यांचेकडून आल्यास मंडळाकडून प्रसिद्ध केले जातील. या खंडांत भांबोरकर भोंसले यांचे लेख प्रसिद्ध करण्यांत येत असल्यामुळें श्री. शिवाजीराव राजे यांजकडून मंडळाकडे आलेले लेख हे भांबोरकर भोंसले घराण्याच्या शाखेपैकीं एका शाखेचे असल्याकारणानें मागें न ठेवतां याच खंडांत छापणें युक्त वाटल्यावरून ते आम्हीं या खंडांत छापले आहेत. श्री. शिवाजीराव राजे यांच्या संग्रहीं फारशी लेख असल्यास ते त्यांनीं मंडळाकडे प्रसिद्ध करण्याकरितां दिल्यास भांबोरकर भोंसले घराण्याच्या मराठी ऐतिहासिक लेखांचा तो दुसरा भाग प्रसिद्ध करण्यांत येईल, त्यांत या लेखांचा समावेश मंडळास करतां येईल.

लेखांक १ ] श्री [ तारीख १-४-१७०८

स्वस्ति श्री राज्याभिषक शके ३४ सर्वधारीनाम संवछरे चैत्र बहुल सप्तमी गुरुवासरे क्षेत्रिया कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी




देसमुख व देसपांडिये पा खरी सा पाथरी यासी अज्ञा केली ऐसीजे पा मा पेसजी मोकासी होत. त्याकडून दूर करून हाली राजश्री खलोजीराजे भोसले याच्या जमावाचे बेगमीस मोकासा दिल्हा असे तुही मानुलेस रुजू होऊ खंडणीप्रमाणें मोकासबाबेचा वसूल मानुलेकडे देणे याखेरीज कोणास न देणे निदेश समक्ष

मर्यादेयं विराजते

लेखांक २ ] श्री [ तारीख २८-९-१७१९

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४६ विकारी सवंत्सरे अश्विन बहुल एकादसी सौम्य वासरे क्षेत्रिये कुलावतंस श्री राजा शाहूछत्रपती स्वामीणी मोकदमान मौजे भामोरें परगणे चाभारगोंदे यास आज्ञा केली ऐसीजे मौजे मजकूर पेसजी पासून राजश्री खेळोजीराजे भोसले यास मोकासा आहे त्या प्रो हल्ली करार आहे तर तुम्ही मारनिलेकडे रुजू होऊन मोकासबाबेचा वसूल देणें दुसरेकडे एक रुका वसूल न देणें लेखनालंकार मर्यादेयं विराजते

रुजू सुरनवीस सा मा

. बार सूद सुरु सूद बार बार







१ हीं अक्षरें निराळ्या वळणाचीं आहेत.

लेखांक ३ ] श्रीशंकर [ तारीख २१-३-१७२८

आसल नकल

॥ श्रीसिद्धेश्वर ॥ श्रीविश्वनाथ ॥

श्रीशके १६४१ प्लवंगनाम संवछरे चैत्र वद्य ७ वार शुक्रवार ते दिवशीं धर्ममूर्ती राजश्री तपोनिधि बाळभारती गोसावी यांसी खेळोजी राजे भोसले निमे मोकदम व बहिरजी पा। व माणकोजी पा। व चापजी पा। निमे मोकदम व समस्त दाही जण मौजे भाबरे प्रा। चाभारगोंद कारणे धर्मपत्र लेहून दिल्हे औसीजे मौजे मजकुरी धर्मादाव तुम्हास इनाम थळ वागमोरे पैकी नजीक भिवरा मानाजी कोंढी याचा थळावर ते जमीन चावर ॰॥॰ निमे मा। बिघे ६० साट मठाबा। धर्मादाव इनाम दिल्हा आसे सुखे कीर्दं करून परंपरा खात जाणे यांसी जो कोन्ही हारकत करील त्यासी कुलस्वामीची आण आसे जोवर तुमची परंपरा मठीं राहील तोवर कीर्दं करून निमे चावर खाणे यासी आणी सारीखे करून तर आपणास वाराणसीमधे श्री चे पुजेस पाय लावलीयाची आण आसे आगर हार कोन्ही पांढरीमधे जो धर्मास हारकत करील यासही पत्रप्रमाण आण आसे हे इनाम पत्र लिहिले सही

नि॥ नांगर

( येथें नांगराची आकृति )

पत्रप्रमाणसाक्ष धोंडजी र
घुनाथ देशपांडे प्रा। रासीन
रघोजी पा। भोसले मौजे हिंगणगांव प्रा। कडेवळित
वैनजी सेडगे पा। मोजे वाटलींज

वि॥ मल्हार गोविंद कुळकर्णी मौजे मार
पत्रप्रमाण साक्ष

बलुते बारा मौजे भाबरे

गोही

कृष्णाजी बकाजी देशमुख प्रा। मार
जगंनाथ हंस देशपांडे प्रा। मार

लेखांक ४ ] श्री [ तारीख २७-३-१७४९

माहाराज राजेश्री रुस्तुमजी बाबा राजे भोसले
मो। मौजे भाबोरे साहेबाचे सेवेसी

नेम उतर सके १६६८ क्षय नाम सवतछरे चैत्र वद्य ९ बुधवार ते दिवसी मानाजी लोंढे व समस्त दाही जण मौजे मार पा। चांभारगोंदे सुा

सन ११५५ कारणे नेम उतर लेहून दिल्हे येसाजे साहेबी अ सपुर सीस मिरास सेते अपणाला चाहूर या विशई पुरसीस दोघाकडे निमेनिम असावे ते अधिक उणे केल्यास आज दिवस लावणीचा या करिता नेमलेहुन ठेविलाने सन ११६६ दिवालीच्या पाडवियास या गोष्टीचा शाहानिशा करून देऊन नेमास अंतराये होणार नाहीं नेमास दाखला पुरऊन न देऊ तर गोताचे खोटे हे नेम उतर लेहून दिल्हे सही तेरीख २१ रावल

बा मैराळ येसाजी कुळकर्णी मौजे मार.

गोही

नागोजी पा सुद्री + + + साजी गावडे वा मौजे बोरसगाव

लेखांक ५ ] श्री [ तारीख १७-४-१७५०

मोकदमानी मौजे भामोरें पा चांभारगोंदें यांसी आज्ञा केली येसीजे मौजे मजकूर पेसजी पासून रा ककाजी राजे भोंसले यास मोकासा आहे तेणेप्रमाणें हाली करार केला आसे तरी यांसी रुजू होऊन मौजे मजकुरच्या मोकासबाबेचा वसूल सुरलीत मशारनिलेकडे देणे उजूर न करणें जाणिजे छ २० जमादिलावल सन खमसैन मया व अलफ वसूल देणे[1]

लेखांक ६ ] श्री [ तारीख ३।७।१७५४

*




आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री बाळाजी पंडित प्रधान ता मोकदमानीं मौजे भांबोरें ता चाम्हारगोंदें प्रा कडेवलित सुा खमस खमसैन मंया व अलफ मौजे मजकूर हुजरून राजश्री ककाजी राजे भोसले यास मुकासा पेशजींपासून आहे त्याप्रमाणें

1 हीं अक्षरें निराळ्या वळणाचीं आहेत.

* टीप:- या मुद्रेंत मुख्य प्रधान असे शब्द नाहींत.

करार असे तरी मार निलेकडील कमाविसदारासी रुजू राहोंन मुकासबावेचा वसूल सालाबादप्रमाणें सुरलित देणें जाणिजे. छ ११ रमजान आज्ञा प्रमाण लेखन सीमा

लेखांक ७ ] श्री [ तारीख ९-११-१७७०

राजश्री ककाजी भोसले गोसावी यासी

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्री माधवराव बलाल प्रधान आशीर्वाद सु॥ इहिदे सबैन मया व आलफ खासा स्वारी पुण्याहून जेजुरास आली तेथून कूच करून मजल दर मजल कर्नाटकांत जात आहे तरी तुम्ही देखत पत्र जमानसी हुजूर येणें एक घडीचा विलंब न करणें जाणिजे छ २० रजब बहुत कार्य लिहिणे[2] मोर्तब सुद

— श्री ०
श्रीराजाराम नरप
ती हर्षनिधान माध
वराव बल्लाळ
मुख्य प्रधान

लेखांक ८ ] श्री नकल [ तारीख २८-१-१७७५

आखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्ये राजेश्री बलवंतराव गोपाळ

सेवक माधवराव नारायेण प्रधान नमस्कार सु॥ खमस सबैन मया व आलफ ककाजी भोसले याजकडे मौजे भांबोरे प्रा चांभारगोंदे येथील मोकासा सरंजाम आहे त्यास मल्हारतुळे तीर्थस्वरूप रा दादासाहेबाकडे चाकरीस गेले होते सबब जप्ती मोकाशाचे आमलाची करुन जप्ती तुम्हाकडे सांगितली होती हाली मार निले तिकडून इकडे चाकरीस आले स॥ जप्ती मोकली केली आसे तरी सुदामतप्रा आमल गावचा याजकडे चालवणे जप्ती केली असेल ते मोकली करणे जाणिजे छ २५ जिलकाद आज्ञाप्रमाण

---

१ हीं अक्षरें निराळया वळणाचीं आहेत.

२ हीं अक्षरें माधवराव बलाल यांचे हातचीं आहेत.

लेखांक ९ ] श्री [ तारीख २०-८-१७७१

राजश्री ककाजी भोसले गोसावी यांस

(श्री) अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्री माधवराव नारायण प्रधान आसीर्वाद सुा समानीन मया व अलफ स्वारी बाहेर लौकर निघणार आहे तरी तुम्हीं पत्रदर्शनी जलदीनें हुजूर येऊन पोहोचणे दिरंग न लावणे जाणिजे छ ७ शाबान बहुत काय लिहिणें[1] लेखन सीमा

० श्री
राजा शाहू नरपती
हर्षनिधान माधवराव
नारायण
मुख्य प्रधान

लेखांक १० ] श्री [ तारीख ४-७-१७९७

आज्ञापत्र राजश्री ककाजी राजे भोसले ता मोकदम कसबा नाजनद प्रात कडवलित सुा सलासद तिसैन मया व आलफ तुम्हीं आर्जदास्त पा ते पावली लिहिला मजकूर ध्यानांत आला + + + आज्ञा घेऊन गला की कुलकर्णी व गावकरी यास घेऊन येतो त्यास करारा प्रो पा कुलकर्णी येऊन बोलणे होऊन समजुतीचा विचार होऊन यईल तर देखत आज्ञापत्र पा आहे तर हुजूर येणे कोन्हविसी दिकरा न धरण जाणिजे छ ९ माहे मोहरम मोर्तब सुद



लेखांक ११ ] श्री [ तारीख ८-१०-१७८१

राजश्री ककाजी भोसले गोसावी यासी

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्री माधवराव नारायण प्रधान आसीर्वाद सुा तिसैन मया व आलफ तुम्ही तयार होऊन चाकरीस सत्वर हुजूर येणें जाणिजे छ ११ मोहरम बहुत काय लिहिणें[1] लेखन सीमा

---

१ हीं अक्षरें निराळया वळणाचीं आहेत.

१ हीं अक्षरें निराळया वळणाचीं आहेत.




लेखांक १२ ] श्री [ तारीख १६-४-१७९४

ता धर्मनाईक मौजे भाबोरे यांसी सुा आर्बा सितैन मया व अलफ तू नाजन विसीई ताकीदपत्राविसीई आर्ज केला होता त्याजवरून ताकीदपत्र आणले आहे तर चिटीदखत का पेडगावास जलदी येणे मागती आम्हास श्रीगोदीयांसी जावे लागते तरी तू जलदी येणे जाणिजे छ १५ माहे रमजान

लेखांक १३ ] श्री [ तारीख १९।२।१८०१

राजश्री रावोजी भोसले भांबोरकर गोसावी यांस

॥ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्री बाजीराव रघुनाथ प्रधान आसीर्वाद सुा इहिदे मयातैन व अलफ तुम्हाविसी राजश्री अनंदराव निंबाळकर याणी विनंति केली त्याजवरून हें पत्र सादर केलें असे तरी तुम्ही आणि सरजासुधा निघोन हुजूर येणें जाणिजे छ ५ सवाल बहुत कार्य लिहिणे[1]







लेखांक १४ ] श्री [ तारीख २३-१०-१८१९

सीका नकल

इजतअसर कृष्णाजी जनार्दन कमाविसदार प्रां जामखेड ता कडवालित बा ५ आर्जं ता कपतान हनरीन पाटजर साहेब बहादूर कलकटर सुभा आहमदनगर

1 हीं अक्षरें निराळ्या वळणाचीं आहेत.

सलाम आणीकी ककाजी भोसले पेशजी ककाजी भासले होते त्याचे पंतु याजकडे जातीस सरजाम मौज भाबोरे ता श्रीगोदे प्रांत कडवलित येथील मोकासा चालवणे विसी हुकूम होऊन पुन्याहून सहेनाची यांद आली त्याजवरून हुकूम केला जाताना मौज मजकूर येथील मोकाशाचा आंमल वसूल करून आमानत ठेवून हुजूर मालुंम करणें म्हणजे ऐवज हुजूर आनून मशारनिलेस आखर साली दिल्हा जाईल जानीजे तारीख २३ माहे आकटंबर सन १८१९ इ॥ सहीन इंग्रजी

लेखांक १५ ] श्री नकल [ तारीख १-६-१८२१

सरकार कुपणी इग्रज बहादूर ठाणे घोडनदी पो ता मोकदम मौजे भाबोर प्रा श्रीगादे सुा इहिदे अशरीन मयातैन व आलफ मौजे मजकूर यथील मोकासी आमल ककाजी राजे भासले याजकडे जातीचे सरमजामा आहे त्याजबाबद ऐवज माहालचे खजान्यास वसूल घेऊन अखर साली मारनिले राजे यास देयावयाचे त्यास मौजे मार यथील सदरहू आमला बा सालमार सन तीस फसलीचे आकाराअन्वयें रुपये ३२७॥ तीनशे सतावीस रुपये साढेनव आणे पो वसूल माहाल खजान्यास आला ते आमानतीकडे जमा होऊन मारनिलेस दिल्हे गुा सदासिव दसमाणे रुपये ३॥॥ बाकी गावाकडून येणे ते रुपये ३२३॥ यकूण तनिसे तेवीस रुपये दाहा आणे खुद मारनिले यास देऊन पावती घेने जाणिजे छ १ जून सन १८२१ इसई मोर्तब सुध

लेखांक १६ ] श्री नकल [ ता. २३-१०-१८२१

सिका

इनत आसार कृष्णाजी जनार्दन क॥ दार प्रा जामखेड ता कडे

अजतर्फे कपतान हानरी पाटजर साहेब बहादूर कलकटर सुभा आमदानगर सलाम अ ककाजी भासले पेशजी ककाजी भासले होत त्याचे पतु याजकडे जातीस सरमजाम मौजे भाबर ता चाभारगादे प्रा कडवालित यथील मोकासा चालविन्याविशई हुकूम होऊन पुन्याहून सहनाची याद आली त्याजवरून हुकूम केला जातो जे मौजे मार यथील मोकाशाचा आमल वसूल करून अनामत ठेवून हुजूर मालुम करणे म्हणजे ऐवज हुजु आणून मानुलेस आपली साली जाईल जाणीजे ब तारीख २३ माहे आकटाबर सन १८१९ इसवी सहन इग्रजी

लेखांक १७ ] श्रीनकल [ तारीख १५-४-१८२२

राजेश्री भगवतरावजी शेकदार स्वामीचे शेवेसी पो माधव भावाजी ता कोरटी सा नमस्कार विनंति उपरी ककाजीराव भो मौजे भावोरे प्रा श्रीगोंदे यास मौजे भावोर यथील मोकाशाचा आमल जातीचे सरमजामास आहे त्यास इजारपट्यास याचे नावे रुपये ४१९॥। चारचे यकूणस रुपये बारा आने रुपये पडला आहे त्यास हलीं सरकारचा हुकूम ते दीं ३० माहे मार्चीचा दाखल जाला कीं सरमजामी लोकास ऐवज देऊन पावल्या घेने त्याजवरून त्याच्या पावल्या यथे लहून घेऊन तुम्हास लि॥ आहे तर मौजे मजकुराकडे ऐवज आनामत च्यारचे यकूनीस बारा आणे आहेत ते गावकरी यास परवानगी सागुन याचे यास देववावे फिरून बोभाट याचा न यावा रा। मिति चैत्र वा। ९ सक १७४४ बहुत काय लि॥ हे विनंति—



# भांबोरकर घराण्यापैकीं शिवाजीरावराजे शंकररावराजे भोंसले यांच्या संग्रहांतील फारशी ऐतिहासिक लेख राजवाडे मंडळाचें निवेदन

( लेखक—भास्कर वामन भट, चिटणीस रा. सं. मंडळ धुळें )

श्री. भिकाजीराजे भोंसले यांच्या संग्रहांतील फारशी लेख १४५ छापल्यावर श्री. शिवाजीरावराजे यांच्या संग्रहांतील मराठी ऐतिहासिक लेख सोळा छापून झाले; तों त्यांचेकडून त्यांच्या संग्रहांतील ३१ फारशी लेख प्रसिद्ध करण्याकरितां आमचेकडे आले. यापूर्वीं भांबोरकर भोंसल्यांच्या ऐतिहासिक लेखांचा खंड पुरा करून "संपादकीय निवेदन, मंडळाचें निवेदन, ग्रंथाचें मुखपृष्ठ, ग्रंथाची सूचि वगैरे मजकूर छापून हा ग्रंथ वाचकांच्या हातांत द्यावा असा संकल्प आम्हीं केला होता, परंतु शिवाजीरावराजे यांचे फारशी लेख हातीं येतांच हा संकल्प बदलून ते नवीन लेख याच खंडांत प्रसिद्ध करावे व त्यांचा मराठी अनुवाद याच खंडांत द्यावा असें वाटल्यावरून हे लेख याच खंडाचा एक भाग म्हणून प्रसिद्ध करण्याचें आम्हीं ठरविलें. यानंतर मंडळाचे उत्साही सभासद श्री. गोपाळ राजेश्वर पाडळकर यांचेकडे या लेखांच्या फारशी नकला व त्यांचे मराठी अनुवाद करण्याचें काम आम्हीं सोंपविलें. त्यांनीं तें काम शक्य तितक्या लवकर पुरें केलें असून हा साग्र ग्रंथ वाचकांचे हातांत देण्याचा सुयोग प्राप्त झाला आहे. श्री. पाडळकर यांनीं या लेखांचा अनुवाद मागील निवेदनांत नमूद केलेल्या पद्धतीनें केला आहे.

शिवाजीरावराजे भोंसले यांचे हे लेख भिकाजीराजे भोंसले यांच्या संग्रहापैकींच आहेत. एकाच घराण्यास मिळालेल्या जहागिरी, वतनें, इनामें यांसंबंधाचे, व एकाच प्रदेशांत इ. स. १६३६ ते १७०७ पावेतों झालेल्या घडामोडींच्या हकीगतीसंबंधाचे हे लेख असल्यामुळें ते सर्व एकेच वेळीं हातीं येऊन त्यांचें संपादन एकाच लेखांत झालें असतें तर या लेखांकरितां स्वतंत्र निवेदन लिहिण्याची आवश्यकता नव्हती, परंतु तसा योग जुळून न आल्यामुळें स्वतंत्र निवेदन लिहिणें प्राप्त आहे. मागें छापलेल्या कित्येक लेखांचे आधारें केलेल्या विधानांचा संदिग्धपणा या संग्रहांतील लेखांमुळें नाहींसा होणार आहे. त्याचप्रमाणें तत्कालीन कांहीं महत्त्वाची नवीन माहिती या लेखांवरून उपलब्ध होत आहे. एवढा प्रास्ताविक खुलासा करून या लेखांच्या स्वरुपाचें अनुक्रमें अल्प दिग्दर्शन करतों.

लेखांक १—पूर्वीं छापलेल्या व या भागांत छापलेल्या लेखांत हा लेख सर्वांत जुना म्हणजे इ. स. १५८९–९० सालचा अकबराचे कारकीर्दी-पैकीं आहे. किल्ल्याचे फारशी नांवाचीं कांहीं अक्षरें फाटल्यामुळें किल्ल्याचें सबंध नांव समजत नाहीं. फक्त ‘ हरी ’ एवढीं अक्षरें वाचतां आलीं. किल्ला कोणत्या परगण्यांतील आहे याचा उल्लेख या लेखांत आढळत नाहीं. बादशाही मुलखापैकीं पावसाच्या अभावामुळें एखादा प्रदेश बेचिराख झाला तर त्याची आबादी कशा पद्धतीनें व कोणत्या सवलती प्रजेस देऊन करण्यांत येत असे याची बरोबर कल्पना या लेखावरून करतां येते. किल्ल्याच्या आवतींभोंवतींच्या खेड्यांवर सत्ता किल्लेदाराची असे व त्या खेड्यांतील जमिनी धारण करणाऱ्या प्रजेकडून जमिनीचें सरकारदेणें वसूल करण्याचा अधिकार किल्लेदारास असे. खेड्यांतील प्रजेकडून वसूल करण्यांत येणाऱ्या सरकारी धान्यांतून कोणकोणास किती रकमा कोणत्या प्रमाणांत मिळावयाच्या याची बरोबर कल्पना या लेखावरून येते. तत्कालीन राज्यपद्धतीच्या अंतर्गत किल्ले व त्यांखालील गांवें यांतील जमिनीच्या सरकारी खडाच्या वसुलीच्या विभागणीच्या अस्तित्वांत असलेल्या पद्धतीच्या इतिहासाच्या दृष्टीनें हा लेख फार महत्त्वाचा आहे. प्रसिद्ध झालेल्या साधनांत अशा प्रकारचे लेख क्वचित् आढळतात.

ले. २– जळगांव परगण्याचे देशमुखीवतन परसोजी राजे भोंसले यांस जहागीर दिल्याबद्दलचा हा लेख आहे.

पूर्वीं छापलेल्या इ. स. १६५४ च्या लेखांक ५ प्रमाणेंच हा लेख इ. स. १६६३ सालचा आहे. बादशहाकडून तें वतन परसोजी राजे भोंसले यास जहागीर मिळालें. परसोजीच्या पश्चात् त्याचा पुत्र सयाजीराजे भोंसले हा

वतनाचा मालक होऊन त्याचा उपभोग घेऊं लागला. तथापि सरकारी दप्तरांत परसोजीचे नांवानेंच वतन चालू राहिलें. यावरून मूळ वतन ज्यास जहागीर दिलें असेल त्याचें नांव तो मयत झाला तरी सरकारी दप्तरांत चालू ठेवावयाचें असा त्या वेळच्या बादशाही राज्यपद्धतीचा प्रघात असल्याचें या लेखावरून दिसतें.

ले. ३–कडेवलीत परगण्याची वहिवाट सयाजी राजे करूं लागल्यापासून उत्पन्नाची वाढ सालोसाल होत गेल्याचा या लेखांत उल्लेख करण्यांत आला आहे. त्यावरून सयाजीराजे हा कर्तबगार व दक्ष असल्याचें सिद्ध होतें. मिर्झा राजा जयसिंग याला या जहागिरीबाबद सयाजी राजे यांनीं विनंती केल्याचा उल्लेख यांत आहे व ही जहागिरी त्याचेकडे ठेवण्यांत यावी, अशी शिफारस बादशहाकडे जयसिंगनें केल्यावरून ही जहागीर सयाजीकडे कायम ठेवण्याचा हुकूम बादशहानें केला. या गोष्टीचा उल्लेख या लेखांत करण्यांत आला आहे. हा लेख तारीख १८ नोव्हेंबर १६६६ चा आहे. राजा जयसिंग हा उत्तरेकडून औरंगजेबचे हुकुमावरून शिवाजीवर स्वारी करण्याकरितां इ. स. १६६४ च्या अखेर आला व पुरंदर किल्ल्यास त्यानें तारीख ३१ मार्च १६६५ रोजीं वेढा घातला. दक्षिणेंत आल्यावर जयसिंगानें प्रथम शिवाजीविरुद्ध असलेल्या लोकांच्या भेटीगांठी घेऊन त्यांना आपले बाजूस आणिलें. दक्षिणेंत जयसिंग आल्याचें कळतांच सयाजीनें त्याची भेट घेऊन या पत्रांत नमूद केल्याप्रमाणें बादशहाकडे या जहागिरीबाबदची शिफारस मिळविली. शिवाजीचा एक निकटचा कर्तबगार नातेवाईक या नात्यानें सयाजीच्या मागणीबाबद शिफारस बादशहाकडे केल्यास सयाजी आपल्यास शिवाजीविरुद्ध केल्या जाणाऱ्या हालचालींत अनायासें सामील होईल असें जाणून या पत्रांत नमूद केल्याप्रमाणें शिफारस बादशाहाकडे जयसिंगनें केली, व त्यामुळें सयाजीस ही सनद दिली गेली हें उघड आहे. जयसिंगाची शिफारस बादशहाकडे जाऊन तीप्रमाणें सनद ता. १८ नोव्हेंबर १६६६ रोजीं सयाजीस देण्यांत आली. तत्पूर्वीं म्हणजे इ. स. १६६५ च्या अखेर पुरंदरचा वेढा सातआठ महिने चालू राहून औरंगजेबाबरोबर जयसिंगाच्या मध्यस्थीनें शिवाजीचा तह झाला. जयसिंगाच्या दक्षिणेंतील आगमनामुळें स्वतःचा स्वार्थ साधण्याची उत्तम संधि प्राप्त झाली आहे असें पाहून सयाजीनें ही सनद मिळविण्याची खटपट केली. स्वराज्याच्या व स्वातंत्र्याच्या प्राप्तीकरितां मोंगल बादशहाशीं लढणारा शिवाजी हा आपला निकटचा नातेवाईक आहे, व त्याच्यावरील संकटाच्या काळीं तटस्थ राहून बादशहास साह्य करूं नये असा विचार त्याच्या मनांत आला नाहीं !

ले. ४ – हा कुळकर्णीवतनाच्या वादासंबंधाचा आहे. वाद करणाऱ्या पक्षकारास पंचांकडे पाठवून वादाचा निकाल करून घ्यावा. निकाल न झाल्यास वाद करणाऱ्यास सरकारी अधिकाऱ्यांकडे पाठवावें असें या लेखांत नमूद आहे. मोंगल बादशहांचे अमदानींत महाराष्ट्रांत व्यवहारनिर्णयपद्धति पूर्वापार अस्तित्वांत होती ती नाहींशी न करितां मोंगल बादशहांनीं कायम ठेविली, असें या लेखावरून दिसून येतें.

ले. ५—युवराज महंमद मुआज्जम ऊर्फ शहा आलम याचा तारीख २४ जुलै सन १६६६ चा हा हुकूम आहे.

दक्षिणचा सुभेदार राजा जयसिंग बऱ्हाणपूर येथें तारीख २ जुलै १६६७ रोजीं मरण पावला. त्यापूर्वींच मे महिन्यांत दक्षिणच्या सुभेदारीवरून औरंगजेबनें त्यास दूर करून युवराज मुआज्जम् याची दक्षिणच्या सुभेदारीवर नेमणूक केली होती. तो सुभेदारीवर असतां सयाजी राजे यांनीं नादनज व अलमगीरपूरपेठ बादशहानें त्यास जहागीर दिली होती. ती त्याचेकडे कायम असल्यामुळें सरकारी अधिकाऱ्यांनीं त्याचेकडून नवीन सनद मागूं नये असा हुकूम व्हावा, असा सयाजीनें अर्ज महंमद मुआज्जम् याचेकडे केला. त्यावर तो अर्ज प्रथम मुख्य प्रधान मुकरमखान याचेकडे पाठविण्यांत आला. त्यांनीं तो मान्य करून त्यावर आपली सही केली. त्यांच्या रिसालयांतील कारकुनानें मान्यतेचा शेरा लिहिला व त्यावर मुख्य प्रधानानें सही केली. याप्रमाणें मुख्य प्रधानाची सही झाल्यावर राजपुत्र महंमद मुआज्जम् यानें शेवटचा हुकुम दिला. औरंगजेबचे काळीं या प्रकारें लेख लिहिण्याचा प्रघात अस्तित्वांत होता. जहागिरीबाबद कोणीं अर्ज केल्यास ज्याकडे अर्ज केला असेल त्याचा हुकूम प्रथम नमूद करावयाचा व त्याखालीं शेवटचा हुकूम करावयाचा ज्या व्यक्तीस अधिकार असेल त्याचा हुकूम लिहिण्यापूर्वीं घडलेल्या हकीगतीचा तपशिलासह उल्लेख करावयाचा या पद्धतीस अनुसरून हा लेख असल्याचें दिसतें.

ले. ६—हें पत्र गुणाजीस लिहिलेलें आहे.

पुढील लेखांक १६ त सयाजीच्या बायकोचें नांव गुणाजी असल्याचें नमूद आहे. यावरून या पत्रांतील गुणाजी ही तीच असावी असें वाटतें. इ. स. १६७२ सालांत सैन्यांत दाखल होण्यास कित्येक तरुण तयार आहेत, असें सयाजीराजानें बादशहाच्या वरिष्ठ अधिकाऱ्यास कळविलें. त्याच्या हुकुमावरून हें पत्र त्याच्या हाताखालील अधिकाऱ्यानें गुणाजीस लिहिलें. सैन्यांत दाखल होण्याविषयीं तरुणांचीं मनें वळविण्यांत यावीं असें या पत्रांत लिहिलें आहे. या पत्रांतील परराष्ट्रांतील नोकरीच्या शिरस्त्याप्रमाणें नोकरींत

घेतलें जाईल असा जो उल्लेख आहे त्यावरून त्या काळीं सैन्यांत दाखल होणारास परप्रांतांत नोकरी करावयाची असल्यास त्याच्या विशेष प्रकारच्या अटी असत असें दिसतें.

ले. ७—शिवाजीच्या मरणानंतर औरंगजेब प्रचंड सैन्य घेऊन दक्षिणेंत दाखल झाला. त्यानंतर मराठ्यांच्या मुलखावर त्याच्या स्वाऱ्या होऊं लागल्या. मराठ्यांनीं बादशाही मुलखावर हल्ले चढविण्यास सुरुवात केली. अशा प्रकारच्या दोन हल्ल्यांत सयाजीराजे बचावले गेले याबद्दल समाधान व्यक्त करण्याकरितां त्यांच्या परिचित गृहस्थानें त्यांस हें पत्र लिहिल्याचें दिसतें.

ले. ८—पेठ अलमगीरपूर येथील शेटेगिरी व महाजनगिरीचे वतनाबद्दलचा हा लेख इ. स. १६८२ तला आहे. सयाजीराजे मरण पावल्याचा उल्लेख या लेखांत आहे. शेटेगिरीचें वतन राजरूप याचे नांवचें व महाजनगिरीचें वतन अबदुल्ला रजाक् याचे नांवचें दाखल झालें. त्यावर अबदुल रजाक् व त्याचा भाऊ यांनीं बंड करून ते शत्रूस मिळाले. सबब शेटेगिरीचें वतन रुस्तुमजीचे नांवचें व महाजनगिरीचें वतन राजरूपचे नांवचें सयाजी राजे यांनीं नेमून दिलें असा उल्लेख या लेखांत आहे.

ले. ९—जाफरजंग याच्या हुकमांत, अलमगीरपूर पेठेंतील लोकांनीं पेठेंतील आपापल्या घरीं जावें व आपआपली शेती व उद्योगधंदे करीत रहावें असें हुकमांत नमूद आहे. मराठ्यांनीं अलमगीरपूर पेठ लुटून उद्ध्वस्त केल्याचा उल्लेख पूर्वीं छापलेल्या लेखांत व निवेदनांत आला आहे. पेठ लुटल्यावर फेरोजजंग यानें पेठेंतील लोकांस पेठेंत वसाहत करण्याबद्दलचा कौलनामा दिला.

ले. १०—परगणे अष्टी व नादुणन परगणे कडेवलीत यांच्या ठाणेदारीवर राजरूप याची नेमणूक करण्यांत आली असून त्यास दरसाल रुपये अडीचशें देण्यांत यावे, त्याचप्रमाणें रुस्तुमजीसही दरसाल रुपये २५० नेमून देण्यांत आले आहेत असा उल्लेख यांत आला आहे. याशिवाय राजरूप याच्या तैनातीस चाळीस इसम, याशिवाय शरीफजी वल्लद परसोजी यास शंभर स्वार व शंकराजी यास १५० स्वार देण्यांत आल्याचें या लेखांत आहे.

ले. ११—राजरूप वल्लद सयाजी याच्या नोकरींत असलेल्या शिपायाचें वर्णन व त्याच्या शरीरावरील खुणा यांची नोंद या लेखांत आहे. सैन्यांत दाखल करावयाच्या शिपायांच्या शरीराचें वर्णन व शरीरावरील खुणा यांची नोंद करण्याच्या तत्कालीन प्रघातास अनुसरून हा लेख तयार करण्यांत आला आहे. याविषयींचें विवेचन पूर्वीं करण्यांत आलें आहे.

ले. १२—नादुणज व अलमगीरपूर येथील शेटेगिरी व महाजनगिरीच्या वतनासंबंधाचा इ. स. १६८४ चा हा लेख आहे. त्यांत अबदुल्लानें बंड

केल्याचा व तो शत्रूस मिळाल्याचा उल्लेख आहे. या लेखापूर्वी इ. स. १६८१ चा लेखांक ८ आहे. त्यांत या लेखाप्रमाणेंच सयाजीराजे यांनीं हीं वतनें रुस्तुमजी व राजरूप यांचे नांवचीं करून दिलीं असून त्या अन्वयें वतनाची वहिवाट ते करतील व लोकांनीं त्यांना वतनदार समजावें असें नबाब खान जहानबहादूर यांनीं देशमूखदेशपांडेवतनदार परगणे कडेवळीत यांना कळविलें आहे. या वतनांसंबंधाचे लेख यापूर्वी छापण्यांत आले आहेत.

ले. १३ – हा लेख इ. स. १६८२ चा आहे. ते वेळीं औरंगजेबचें विजापूरकरांशीं युद्ध सुरू होतें. बादशाही प्रदेशांतून शिपाई लोक घोड्याचे सौदागर व हत्यारांचे व्यापारी हे विजापूरचे बादशहाचे प्रदेशांत हत्यारें नेत असत. शत्रुप्रदेशांत अशा रितीनें हत्यारांची निर्गत होणें औरंगजेबास विघातक असल्यामुळें हत्यारांची निर्गत बंद करण्याकरितां या लेखांत औरंगजेबनें जाहीरनामा काढून ही निर्गत बंद करण्याचा सक्त हुकूम केला. त्या काळीं मोठमोठे रस्ते, नदींचे उतार या ठिकाणीं सरकारी शिपाई ठेवण्याचा व त्यांच्या परवानगीशिवाय वाटसरूंना पुढें जाऊं न देण्याचा परिपाठ होता. युद्ध सुरू असल्यामुळें परवान्यावांचून हत्यारें नेण्याची मनाई करण्याचा अधिकार या सरकारी अधिकाऱ्यांस देण्यांत आला व शत्रुप्रदेशांत हत्यारांची निर्गत औरंगजेबानें बंद केली.

ले. १४–लेखांक ९ इ. स. १६८२ चा, अलमगीरपूर पेठेंतील लोकांनीं त्यांच्या घरीं राहण्यास जावें व आपआपले उद्योगधंदे करावे, असा काजी महंमद याचा हुकूम आहे. हा लेख गाझीउद्दीनखान बहादूर फिरोजजंग याचा इ. स. १६९५ सालचा आहे. त्यांत अलमगीरपूर येथील पेठेंतील लोकांनीं पेठेंतील घरांत रहावयास जावें व पेठेंत चांगली वसाहत होसतोंपर्यंत धान्य वसुलीची माफी करण्यांत आली आहे असें नमूद करण्यांत आलें आहे. या संबंधाचें विवेचन पूर्वी केलें आहे.

ले. १५–हा महत्वाचा नाहीं, पत्राची नुसती पोंच आहे.

ले. १६–आसहमदनगरचा किल्लेदार अबदुल्लाचा मुलगा दावल यानें बंड केल्यामुळें त्याला कमी करून बुऱ्हाणउल्ला याची किल्लेदार म्हणून नेमणूक युवराज आजमशाहा ऊर्फ महंमद ऊर्फ शहाआलम यानें केली. दावल यास युवराजाचे भेटीकरितां पाठविण्याचा हुकूम करण्यांत आला. त्याबाबद काय तजवीज झाली हें न समजल्यामुळें मुख्य प्रधान आसदखान याचा आसहमदनगरचे किल्ल्याचा कारकून महंमद हुसेन यास खुलासा करण्या-बद्दलचा हा हुकूम आहे. मूळ फारशी लेखांत आसहमदनगर अशीं अक्षरें स्पष्ट आहेत, परंतु या शब्दाचें अहमदनगर हें वाचन युक्त दिसतें. या लेखांत औरंगजेबचा मुलगा अजमशाहा याचा उल्लेख आहे. ता. १ मार्च

१६८२ रोजीं औरंगाबादेस औरंगजेब दक्षिणप्रदेशावर स्वारी करण्याकरितां दाखल झाला व त्यानें अजमशाहा आणि दिलेरखान यांस अहमदनगरकडे जाण्याचा हुकूम केला ( हिस्टरी ऑफ औरंगजेब, व्हा. ४ था, यदुनाथ सरकार, पान २९२ ). अजमशाहा हा जून १६८२ मध्यें अहमदनगराहून विजापूरच्या आदिलशाही मुलखावर स्वारी करण्यास निघाला ( पान २९४ तारीख १३ एप्रील सन १७०० ). त्यानें सातान्याचे किल्ल्यास वेढा घातला. ते वेळीं अजमशहाच्या मध्यस्थीनें मराठ्यांशीं तह करण्यांत येऊन तो किल्ला मराठ्यांनीं मोगलांचे स्वाधीन केला ( पान २६३ ). अजमशहाच्या दक्षिणेंतील हालचालींच्या या तारखा लक्षांत घेतां इ. स. १६८२ पासून १७०० पावेतों तो दक्षिणेंत होता. हा लेख १६९६चा असल्या कारणानें या लेखांत नमूद केल्याप्रमाणें बुऱ्हाणउल्लाची अहमदनगरचा किल्लेदार म्हणून अजमशहानें नेमणूक केली.

ले. १७– हा पैशाच्या व्यवहाराचा आहे. या लेखांत बुऱ्हाणउल्लाच्या नांवाचा उल्लेख आहे. कदाचित् अहमदनगरचा किल्लेदार बुऱ्हाणउल्ला तोच हा असावा.

ले. १८– अलमगीरपूर येथील मशिदींच्या खिजमतीसाठीं साठ बिघे जमीन भार वल्लद दावल यास इनाम दिल्याबद्दलचा हा लेख आहे. लेखावर मुद्रा बुराणउल्लानगरचा किल्लेदार याची आहे.

ले. १९– मागें जे लेख प्रसिद्ध केले आहेत त्यांत सयाजीचे मरणानंतर त्याचे मुलगे रुस्तुमजी व राजरूप यांच्या व अबदुल्ला याच्या दरम्यान तंटे उपस्थित झाले. या तंट्यांची हकीगत मागें छापलेल्या लेखांत आली आहे. रुस्तुमजी व राजरूप यांचेकडून तीस हजार रुपये वसूल करण्याकरितां अबदुल्लानें दिवाणाकडे दावा केला होता. त्याची आपसांत समजूत रुस्तुमजी व राजरूप याची आई म्हणजे सयाजीची बायको गुणाजी हिनें केली व अबदुल्लानें रुस्तुमजी व राजरूपकडे कांहीं घेणें नाहीं असें लिहून दिलें. ही बाई कर्तबगार असावी असें या व मागील लेखांवरून दिसतें.

ले. २०–मागें प्रसिद्ध केलेल्या लेखांत जजीया कर वसूल करावयास लागल्यामुळें लोक गांव सोडून जातात इत्यादि मजकूर आला आहे. राजे रुस्तुम यांनीं ही हकीगत वरीष्ठ सरकारी अधिकाऱ्याकडे जाहीर केल्यावरून ज्याच्या त्याच्या ऐपतीप्रमाणें व कर जरब होणार नाहीं अशा प्रमाणांत वसूल केला जाईल असें आश्वासन लोकांस देणारा हा लेख आहे. हा इ. स. १६९७ चा लेख आहे. लेखाच्या खालीं फारशी लेखाचें भाषांतर मराठी भाषेंत व मोडी लिपींत लिहिलें आहे. मोंगल बादशहांची दरबारी भाषा फारशी होती. ती प्रजेपैकीं फार थोड्या लोकांना समजत असे. यामुळें सर्वसाधारण प्रजेस जो हुकूम माहीत होणें अवश्य आहे, त्याचें मराठी भाषांतर फारशी भाषेंतील

हुकुमाखालीं लिहिण्याची पद्धत त्या वेळीं अस्तित्वांत होती. त्या पद्धतीस अनुसरून या लेखांत फारशी लिपींत व भाषेंत लिहिलेल्या हुकुमाचें भाषांतर मराठी भाषेंत व मोडी लिपींत दिलें आहे. मुसलमानांची राजसत्ता दक्षिणेंत स्थापन झाल्यापासून हा प्रघात अस्तित्वांत आला. प्रस्तुत निजामच्या राज्यांत, त्याचप्रमाणें इंग्रजांच्या राज्यांत या प्रघातास अनुसरून सरकारी हुकूम जाहीर करण्यांत येतात. या प्रकारचे अनेक द्विभाषिक लेख उपलब्ध होऊन प्रसिद्ध झाले आहेत.

ले. २१–कडेवळीत परगण्याचें उत्पन्न परगण्याचा फौजदार महंमद युसूफ हा घेतो. त्यास तसें करण्यास मनाई करण्यांत आली असून गांवचा वसूल त्याचा मालक राजरूप यानें घेत जावा असें या हुकुमान्वयें फर्मावण्यांत आलें आहे.

ले. २२–हा मुख्य प्रधान असदखान याचा देशमूख देशपांडे वतनदार कसबे नादणज यांना नादणज येथील दोन चाहूर जमीन अलमगीरपूरच्या शेटेगिरी व महाजनगिरीच्या नोकरीबद्दल राजरूप वल्लद सयाजी याचे नांवें करण्यांत आली आहे. तरी त्यास कोणीं हरकत करूं नये, अशी ताकीद या हुकुमान्वयें देण्यांत आली आहे.

ले. २३–येथील जमीन मशिदीचा खतीब व इमाम शेख भीकन व शेख बहार व निमाज चालविणारा यांस दोन चाहूर जमीन युवराज महंमद मुआज्जम याच्या हुकुमानें देण्यांत आली आहे असें नादणज येथील सय्यद व शेख लोक यांस जाहीर करण्यांत आलें आहे. मागील लेखांक १८ सोळा सप्टेंबरचा साठ बिघे जमीन कसबा नादणज येथील भार वल्लद दावल यास नादणजचे मशिदीचे खिजमतीकरितां दिल्याबद्दलचा आहे. त्याच मशिदीचा खतीब व नमाज चालविणारा यांना जमीन इनाम देण्याचा उल्लेख या लेखांत आहे.

ले. २४ व २५ – एकाच विषयासंबंधाचे आहेत. अलमगीरपूरपेठेचें उत्पन्न एक हजार पांचशें रुपयांचें आहे. हें उत्पन्न ज्या जमिनीचें आहे तींत गांवचराईची जमीन सामील आहे. अलमगीरपूरच्या जहागिरदाराचा मुलगा या जमिनीस अडथळा करितो. सबब पेठेची व गांवचराईची जमीन वेगवेगळी करण्यांत आली आहे व यापुढें या बाबतींत कोणीं तक्रार करूं नये असें या हुकुमान्वयें सर्वांस जाहीर करण्यांत आलें आहे. या बाबतीबद्दल तक्रार उत्पन्न झाली. त्याविषयींचा १६७३, ७४ सालांत जो ठराव झाला त्या अन्वयें हा हुकूम करण्यांत येत आहे असें या लेखांत नमूद केलें आहे.

ले. २६, २७, २८, २९, ३०–हे विशेष महत्त्वाचे नाहींत.

याप्रमाणें या लेखांच्या स्वरूपाचें दिग्दर्शन करून हें निवेदन समाप्त करतों.



# भांबोरकर घराण्यापैकीं शिवाजीराजे शंकररावराजे भोंसले यांच्या संग्रहांतील

# फारशी ऐतिहासिक लेख

लेखांक १ ] [ इ. स. १५८९-१५९०



मोहोर अरबींत आहे.
मजकूर समजत नाहीं.

قولنامه

هُمایون خلافت مشحون عدالت مخزون از دیوان اعلی عضرت سلطنت پناه عدالت دستگاه ... ... ... خلدالله ملکه و سلطنته شرف صدورو عجز ظهور یافت بجانب دهانیان و مقدمان و رعایائی سکنه جمهور قلعه بهری ... ... مشتمل ... ... در رواج محمد عبدالرود سرگروهان و بیانگواریان و دهایان به پایه سریر خلافت حضرت آمده به شرف اسمان نویسی درگاه ملک انتباه مشرف سر افراز گشته التماس واستدعا نمودند که و لایت مذکور از واسطه قحط غایت خراب خصوصاً از ... ... ... افتاد ـ بمرتبه که چراغ سودی نداده و بعضی مواضع که چراغ سوری دارد استطاعت و طاقت ندارند که درعین قانون ... ... دیوانی بدهانند ـ نظر بمهاثر ارزانی فرد غیرقانون معاف فرموده دیهان بخراب نشود ـ قولنامه همایون استمالت مضمون عاطفیت فرمایند تادیهات معموری رسانیده مال دیوان جایگیر نموده لهذا کمراطاعت برچهنان خود بسته ـ چنانچه برطلبیت ـ درین معنی صرخه و کفایت و حلال خواری ... ... ... بنا بر احوال بخاطر اشرف اقدس ارتم

اهلی آورده ایشان را بمراحیم بادشاهانه فرط عواطف خسروانه نیاز و سرفراز گردانیده از شهور سنه تعین نموده سنه اخذی تعین کرده از سوای معمودی و آبادانی ولایت معاف و دور و مقرر بدین منوال فرموده شده است

---

سکنین دهائی مبلغ یکصد و پنجاه هون
ازینجمله مقرر یکصد هون معاف پنجا هون

---

شرح تقاوی و خرچ تقاوی — کم چاه بابت
باید بموجب دولتی خواجگان — ... ... ... ...
پنجاه و پنج هون از ینجمله مقرر است — معاف پنجاه هون
بیست و هفت هون نیم باقی معاف

---

از بابت خدمتی محمد عبدالله هفتا دو پنج هون
ازینجمله مقرر پنجاه هون الباقی معاف

---

کهاچاری سی هون بیگه ازینجمله — پاندهری سی بیگه ازینجمله
مقرر پاندهری الباقی معاف — مقرر پانزده بیگه الباقی معاف

---

خرما هندوی بیست پنج بیگه
ازینجمله مقرر دو از ده بیگه و نیم معاف

---

هوب فراسخانه پنجاه هون ازینجمله
مقرر بیست و پنج هون الباقی معاف

---

... ... شرابداری و نیز هرجه دار
بیست و چهار هون ازینجمله دوزده هون

---

لازم پوته داری یکصد سی بیگه
ازینجمله مقرر سفت پنج بیگه الباقی معاف

---

مندوساره مقرر چهل هون
ازینجمله مقرر بیست هون

تقدم محلداران مبلغ یکصد هون روان می شود ازین پنجاه
هون مقرر فرموده شده است - مقرر جایز - زیاده اگر صادر شود غیر
تقاوی نوشته بدهند - کحددانه به اوستنانی هجده کندی روان
است آن راست درکندی پنج بیگه مقرر نموده شده است برآن
موجب روان دارند - و از پاپنوسی فرداعی دیهات قریات انگاپور
مضافات قلعه مذکور زیاده درست انراران و افراد از قلعه مذکور بموجب
نشان سابق مبلغ هفتاد هون روان است خارج ... خزانه دیهات
نمایند - دیهات قریات منجمله تحصیل مجراست و مقرر شد - و
چوب در اودخانه ذکارها پنج را سر و مچلیغ دومن و رسمایک من
و سید

भाषांतर

मोहोर अरबींत आहे.
मजकूर समजत नाहीं.

कौलपत्र

महाराजाधिराज सार्वभौम बादशाह.........यांचा फर्मान कीं किल्ला हरी...महंमद अबदुल सरुर यांच्या वहिवाटीस असलेले सर्व मुकद्दम व प्रजागण यांनीं बादशाहाच्या सेवेंत विनंती केली कीं, आमचा प्रांत दुष्काळामुळें फार उद्ध्वस्त झाला. येथपर्यंत कीं तेथें दिवा लावायाला कोणीं राहिलें नाहीं, व ह्या बे-चिराग झालेल्या खेड्यांना सरकारी कायद्यानें ठरविलेले कर देतां येत नाहींत. सरकारांनीं कृपा करून हे कर माफ करावेत व खेड्यांना वांचवावें ह्या विनंतीवरून बादशाह सलामत यांनीं कृपादृष्टि करून कौल दिला कीं, सरकारी उत्पन्न जहागीर समजावी व खेडीं आबाद करावींत. म्हणून बादशाही हुकमाचें आज्ञाप्रमाण मानून ह्या वर्षापासून बादशाही देणगीचा उपभोग घ्यावा व प्रांतांत वस्ती करून आबादानी करावी. खालील प्रमाणें ठराव आहे.

| | | |
|---|---|---|
| खेड्यांचा वसूल एकूण एकशें पन्नास होन. त्यांपैकीं ठराव शंभर होन व माफी पन्नास होन. | तकावी[1] एकूण पन्नास होन पैकीं पंचवीस होन माफी. | बागायती बद्दल एकूण शंभर होन पैकीं पन्नास होन माफी. |

महंमद अबदुल्ला याच्या खिदमतीबद्दल पंचाहत्तर होन पैकीं ठराव पन्नास.
चावडी एकूण तीस होन पैकीं ठराव पंधरा होन व बाकी माफी.
पांढरी तीस बिघे पैकीं ठराव पंधरा बिघे व बाकी माफी.
खुर्मा हिंदी पंचवीस बिघे ठराव पैकीं साडे बारा बिघे माफी.
फरासखान्याचें जंगल पन्नास होन पैकीं पंचवीस होन माफी.
बाराबदारी व हरजादारी चोवीस होन पैकीं बारा होन माफी.

महालदारांचा वसूल शंभर होन आहे. ह्यांपैकीं पन्नास होनांचा ठराव आहे. तो वाजवी समजावा. पण जास्त झाला तर तकावींत द्यावा. किल्ल्यांतील लोकांना पूर्वींप्रमाणें सत्तर होन खर्चीं द्यावेत. एकूण खेडीं व गांव तहसिलींत मुजरा द्यावेत. ह्याप्रमाणें खेडीं आबाद करावींत. कोणत्याही सबबीवर जमीन पडित ठेवूं नये. खेड्यांतील व किल्ल्यांतील लोकांनीं सरकारांत हा ठराव कबूल केला म्हणून कौल दिला आहे. ह्याप्रमाणें वागावें. लबाड व ठक लोकांना शिक्षा द्यावी. कोणत्याही सबबीवर खेड्यांतील लोकांनीं कज्जा व भांडण करूं नये व सरकारी कामांत अडथळा करूं नये. केल्यास शिक्षा होईल. फर्मानाप्रमाणें बादशाही कौल दिला व त्यावर विश्वास ठेवावा. प्रांत भरगच आबाद करावा. दिवसेंदिवस भरभराट होऊन लोकवस्ती वाढवावी. कौलनाम्याच्या हुकमावर बादशाही चिन्ह तारीख २२ रमजान सन ११८

मुख्य प्रधान वजीर आजम दिलावर जहान यांची मोहर.



---

१ तकावी — हा अरबी शब्द आहे. यांचेंच फारसी रूप तगाई किंवा तगावी. याचा अर्थ शेतकऱ्याला मदतीखातर सरकारकडून अगर जमीनदाराकडून मिळालेला कर्जाऊ पैका. मराठीमध्यें सध्यां तगाई हा शब्द या अर्थीं रूढ आहे.

लेखांक २ ] [ तारीख २९ आक्टोबर १६६३

پروانچہ بسہر نواب مستطاب معلی القاب نواب وزیرخان

ہفتم شہر ربیع الثانی سنہ ۶ جلوس والا مطابق سنہ ۷۴ ہجری از قرار بتاریخ آنکہ متصدیان محات حال و استقبال و دیسپانڈیان و مقدمان و مزارعان و سیٹھہ و مہاجنان و رعایان پرگنہ جلگانو سرکار نرنالہ صوبہ برار بدانند کہ چون سابق از قدیم الایّام خدمت دیسمکھی و مقدّمی چند دیہات پرگنہ مسطور بہ پرسوجی مذکور بحضور مزبور-

भाषांतर

नवाब वजीरखान यांच्या मोहरेचा परवाना.

तारीख ७ माहे रबीउलसानी सन ६ जुलूस अथवा १०७४ हिजरी परगणे जळगांव सरकार नरनाळा सुभा वऱ्हाडचे आजी व भावी सरकारी अधिकारी देशपांडे व मुकद्दम व शेतकरी व शेट व महाजन व इतर सर्व लोक यांना कळावें कीं देशमुखीचें वतन व मुकद्दमी बाबत परगणे मजकूर पूर्वापारप्रमाणें परसोजींच्या नांवें हुजुरांतून चालू आहे.

लेखांक ३ ] [ तारीख १८ नोव्हेंबर इ० स० १६६६

ہوالغنی

چون حسب التجویز امارت و امانت مرتبت شوکت و حشمت منزلت عمدۃ راجہای عالیشان بلند مکان مبلغ پانزدہ لک و شصت ہزار و ہشتصد و پنجاہ و چہار دام از است موضع ناندنچ معمولہ پرگنہ کرہ ولیت من مضافات سرکار احمدنگر صوبہ اورنگ آباد خجستہ بنیاد بطریق وطن دروجہہ جاگیر رفعت و شجاعت دستگاہ سیاجی ولد پرسوجی بہونسلہ از آن جہت مشارالیہ از ابتدای تنخواہ حاصل

آن موضع از و فور آبادانی زیاد آورده و مسعی بعالم گیر پور پیتهه نو آباد ساخته بموجب مفصله ضمن مقرر و مفوّض شده می باید که دیسموکهان و دیسپانڈیان و متصدیان و رعایا و مزارعان محال مرقوم موضع مذکور بطریق وطن بموهی الیه مقرر دانسته مالواجب و حقوق دیوانی از قرار واقعی دارسی جواب میکرده باشند - و موضع مسطور و پیتهه مرقوم رادر تنخواه مشارالیه بطریق وطن مقرری بلا تغیّر و تبدیل مقرر سازند - بتاریخ بیست و هفتم شهر جمادی الثانی سنه ۹ جلوس دولت مانوس مطابق سنه ۱۰۷۷ هجری

مقرر شرح ضمن از موضع ناندنیج معموله پرگنه کره‌ولیت سرکار احمدنگر صوبه اورنگ‌آباد که بجاگیر سیاجی ولد پرسوجی مقرر است بطریق وطن بمشارالیه مقرر گشته بموجب فیض حقیقت که بمهر عمله راجهای عالیشان مرزا راجه رسیده آنکه حقیقت سیاجی ولد پرسوجی بهونسله آنکه مشارالیه بعمله راجهای عالیشان مرزا راجه ظاهر نمود که موضع ناندنیج معموله پرگنه کره‌ولیت سرکار احمدنگر صوبه اورنگ‌آباد که یازده لک شصت هزار هشتصد و پنجاه چهار دام جمع رقمی دارد از مدت چند سال در جاگیر بنده درگاه خلایق پناه تنخواه است و درسالی که در جاگیر بنده درگاه مقرر شد همگی مبلغ دو هزار هفتصد روپیه از محصول موضع مذکور به بنده وصول شده بود ودیه خراب و ویران افتاده بود - از آن جاکه بنده تقاوی به رعایا داده و پیتهه مسعی به عالم‌گیر پور نو آباد ساخته از حسن سلوک خود درسال سه هزار نها دو و چهار فصلی بجمع شش هزار هفتصد و شهتاد و نیم روپیه برسانیدیم اُمیدواریم که دیه مذکور بسعه پیته بطریق وطن در جاگیر بنده درگاه مقرر شود - و هیچ وقت تغیور و تبدیل راه نیابد که بنده بجاگیر جمع تلاش آبادانی دیه مذکور توان نمود - عمله راجهائی عالی نیاز نظر برترددو و آبادانی دیه نموده مقرر کردند که موضع مذکور بطریق وطن بسعه پیتهه در جاگیر سیاجی ولد پرسوجی مقرر مفوض دارند وحقیقت آبادان کاری و وحسن سلوک او را داخل واقعه درگاه معلی

نمایند که ہیچ وقت دیه مسطور از جاگیر موسی الیه تغیر و
تبدیل نشود –

( या खालीं अरबी आंकडे व मजकूर आहे परंतु अरबी टाईप नसल्यामुळें ते छापतां आले नाहींत. याच्या मराठी भाषांतरांत ते आंकडे व मजकूर आला आहे. )

بتاریخ ۲۹ جمادی الاول سنه ۹ داخل واقعه درگاه معلی شد +

بتاریخ ۲۹ جمادی الاول سنه ۹ داخل تهانه حضور شد +

یکموضع

भाषांतर

ईश्वर श्रेष्ठ आहे

श्रीमंत महाराजे राजे यांच्या हुकमान्वयें अकरा लक्ष साठ हजार आठशें चौपन्न दामबाबत मौजे नादनज परगणे कडेवळीत सरकार अहमदनगर सुभा औरंगाबादचें जहागिरीचें वतन श्रीमान् राजे सयाजी वल्द परसोजी भोंसले यांच्या नांवें नेमलें आहे. यांनीं वतन मिळालें त्या पाहिल्याच वर्षी मौजे मजकूरचें सरकारी उत्पन्न वाढविलें, वस्ती व आलमगीरपूर या नांवाची एक पेठ नवी वसविली म्हणून खालीं तपशिलांत दिल्याप्रमाणें हें त्यांचें वतन त्यांचेकडे कायम देण्यांत आलें आहे. मौजे मजकूरचे सर्व देशमूख देशपांडे व इतर प्रजागण यांना कळावें कीं हें वतन यांच्या नांवें मुकरर समजून त्यांचें उत्पन्न व इतर दिवाणी हक्क त्यांनीं त्यांना देत जावेत. मौजे मजकूर व पेठ मजकूरचें उत्पन्न त्यांची जहागीर म्हणून त्यांना मिळत जावें व यांत कोणताच फेरबदल करण्यांत येऊं नये. तारीख २७ माहे जमादिउलसानी सन ९ जुलूस अथवा १०७७ हिजरी.

तपशील असा कीं मौजे नादनज परगणे कडेवळीत सरकार अहमदनगर सुभा औरंगाबाद सयाजी वल्द परसोजी यांच्या नांवें जहागीर आहे व हें त्यांचें वतन म्हणून चालू आहे. श्रीमंत महाराजे मिर्जा राजे बहादूर यांना सयाजी यांनीं विनंती केली कीं मौजे नादनज परगणे कडेवळीत सरकार अहमदनगर सुभा औरंगाबादचा वसूल अकरा लक्ष साठ हजार आठशें चौपन्न दाम आहे, व कांहीं वर्षांपासून हा वसूल माझ्या जहागिरींत आहे. ज्या वर्षीं ही जहागीर माझ्याकडे आली त्या वर्षीं दोन हजार आठशें रुपये मला मिळाले व हा गांव नापिक होऊन उजाड झाला. नंतर मी रय्यतीला तकावी दिली व आलमगीरपूर नांवाची एक नवी पेठ वसविली. माझ्या सुव्यवस्थेनें त्या वर्षी तीन हजार रुपये व पुढें चार हंगामांत सात हजार आठशें रुपये वसूल येऊं लागला. म्हणून माझी विनंती कीं, मौजे मजकूर व पेठ मजकूर मला जहागीर देण्यांत यावी. तसेंच यांत कोणताच फेरबदल होऊं नये. मी माझ्या जहागिरीची उत्तम वाढ करूं शकेन. श्रीमान् राजे साहेबांनीं वरील गांवाच्या वस्तीच्या वाढीकडे लक्ष देऊन मौजे नादनज व पेठ आलमगीरपूर सयाजी वल्द परसोजीच्या नांवें जहागीर वतन दिलें व कायम केलें. मात्र यांनीं प्रजेचें सुख पहावें व वस्ती वाढवावी. हें वतन केव्हांही यांच्या जहागिरींतून काढलें जाऊं नये.

अकरा लक्ष साठ हजार आठशें चौपन्न दाम मौजे नादनजचा वसूल

सात हजार आठशें सत्याऐंशीं रुपये वसूल सन १०७४

तारीख २९ माहे जमादिलावल सन ९ रोजीं सनद दरबारीं लिहिली.

तारीख २९ माहे जमादिलावल सन ९ रोजीं छावणींत दाखल झाली.



